# असं पाहा —

## माझ्या गोष्टी, भाग ३ रा.

लेखक

नारायण विनायक कुलकर्णी

संपादक : महाराष्ट्र-कुटुंब-माला, पुणें

१९४६

मुद्रक : न. वि. सरदेशपांडे, आदर्श मुद्रणालय,
३०२/५ सदाशिव पेठ, पुणें शहर.



सोल एजंट

गो. रा. पाटणकर

कॉन्टिनेंटल बुक-सर्व्हिस,

आप्पा बळवंत चौक, पुणें शहर.

प्रकाशक : डॉ. ज. बा. जोगळेकर

२६४ शनिवार पेठ, पुणें २.

## रसिकांचे सेवेशीं —

— चालू १९४६ मध्यें, अत्यंत धामधुमीच्या, बिकट काळामध्यें माझीं दोन छोटीं पुस्तकें रसिकांच्या हातीं देतां आलीं याबद्दल मला अतिशय आनंद होत आहे.

पहिलें पुस्तक — 'मानला तर देव' ही नाटिका नागपूरचे प्रा. श्री. ना. बनहट्टी, एम्. ए., एल्एल्. बी., यांनीं पुरस्कारिली, आणि प्रस्तुत कथा-संग्रह 'असं पाहा —' प्रकाशांत आणण्याचें पुष्कळसें श्रेय माझे स्नेही श्री. य. ग. वझे, बी. ए., एल्एल्. बी. आणि डॉ. ज. वा. जोगळेकर याना आहे. ह्या सर्वांचा मी ऋणी आहें.

प्रस्तुत संग्रहांत आलेल्या कथा ध्रुव, सत्यकथा, यशवंत, नवाकाळ विविध-वृत्त, नवयुग इत्यादि नियतकालिकांतून आजवर प्रसिद्ध झालेल्या माझ्या कथांमधून निवडून घेतलेल्या आहेत. हा संग्रह रसिकांच्या परीक्षेस उतरेल अशी आशा आहे.

रसिकांचा नम्र

ना. वि. कुलकर्णी

---

# माणुसकी आणि कायदा : १

आमचे नाना फडणीस ( इतिहासप्रसिद्ध, महान् मुत्सद्दी नाना फडणीस नव्हेत हो ! ) ज्या जागेत पूर्वी बरीच वर्षे राहात असत, ती जागा त्यांनीं सोडली होती, हें मला माहीत नव्हतें. बऱ्याच वर्षांनीं त्यांच्याकडे जाण्याचा योग यावेळीं मला सहजासहजीं आला. एका मित्राचें झोन तिकिट मिळालें होतें, हक्काची रजाही मिळाली होती. कोठेंतरी चार दिवस चक्कर मारून यावें असें बरेच दिवस मनांत होतें. प्रश्न पडला, जावें कोठें ? मित्रानें आपलें झोन तिकिट देऊन आपलें मित्रप्रेम दाखविलें, तेव्हा म्हटलें याच झोन तिकिटाचा उपयोग करून दुसऱ्या मित्राला भेटलों तर त्याच्यावरील आपलें मित्रप्रेम अनायासें व्यक्त केल्यासारखें होईल. बेत नक्की केला; निघालों. आमच्या नाना फडणिसाकडेच थेट दाखल झालों.

परंतु नाना भेटेपर्यंत वाटेंत एकदोनदां माझी तारांबळ उडविणारी मजा उडलीच चांगली.

दुसऱ्याचें झोन तिकिट घेऊन मी ऐटींत प्रवासाला निघालों होतों; पण रेल्वेच्या कायद्याचें उल्लंघन माझ्या हातून झालें होतें, त्याबद्दल मधून मधून धाकधूक वाटत होती मनाला ! कायदा मोडणारें मन भित्रें बनतेंच नाहीं तरी थोडेंसें. नाहीं का ?

रेल्वे अधिकारी तिकिटें तपासायला आला. मला कसेंसेंच वाटूं लागलें. धीर करून झोन तिकिट त्याला दाखविलें. त्यांत लिहिलेल्या वयाचा आंकडा आणि माझें वय यांत दिसण्यासारखा फरक असावा. त्यानें त्या आंकड्याकडे आणि माझ्याकडे थोडा वेळ पाहिलें. जरा छेडलें. त्याला शंका आली. मीं जीव मुठींत घेऊन शंकेचें निरसन करण्याचा भगीरथ प्रयत्न केला. अधिकाऱ्याचें समाधान झालें नाहीं असें दिसलें. पण त्याला काय वाटलें कोण जाणे, त्यानें जरा मान तुकविल्यासारखें केलें, नाखुषीनें तिकिट माझ्या हातीं दिलें, आणि तो पुढें सरकला. सुटलों मी ! जीव भांड्यांत पडल्यासारखें वाटलें. थोडक्यांत निभलें, नाहीं तर माझ्या ऐटीचा नि आनंदाचा

बोजवारा उडून, झक मारली नी या फंदात पडलों, असें होऊन गेलें असतें. त्या अधिकाऱ्यानें भलेपणानें माणुसकी दाखविली म्हणूनच निभावलें; बोज राहिला. प्रवासाच्या आनंदाला पारखा झालों नाहीं. मनांत मात्र बराच वेळ येत होतें, माणुसकी सोडून केवळ कांटेकोरपणानें अधिकाऱ्यानें कायद्याचीच बजावणी करावयाचें ठरविलें असतें तर? तिकिटापरी तिकिट फुकट गेलें असतें, दंडाचा भुर्दंड भरावा लागला असता, आणि असलेनसलेली अब्रू साफ झाली असती !

माणसाकरितां कायदा असतो, कायद्याकरितां काहीं माणूस नाहीं, हें खरें असलें तरी तें सर्वांच्याच ध्यानीं असेल तर ! त्याची बजावणी त्या दृष्टीनें केली गेली तर त्याचा उपयोग. नाहीं तर करा काय ?

मला त्याचा फायदा मिळाला. त्या अधिकाऱ्याच्या माणुसकीचें मला सानंद कौतुक वाटलें. मनांतल्या मनांत हजार वेळा त्याला मीं मनःपूर्वक धन्यवाद दिले !

पुढें दुसरी मजा ! नाना फडणिसाच्या घरापुढें ( मला माहीत असलेल्या ) टांगा उभा केला. सुंदर दुमजली टुमदार घर होतें तें. माडीवर नानाचे बिऱ्हाड. '**ना. वि. फडणीस** यांचे प्रख्यात **इंग्लिश–मराठी क्लासेस.** तीन वर्षांत सात इयत्ता तयार करण्याचें एकच एक ठिकाण.' इत्यादि मजकुराची लहान-मोठ्या अक्षरांतील भली मोठी पाटी नानांनीं लावलेली: ती त्या ठिकाणीं दिसेना. गॅलरींत नानांचीं मुलें दंगामस्ती करीत असावयाचीं; त्यांचें अस्तित्त्व प्रत्ययास येईना. निदान नाना तरी डोळ्यावर चष्मा चढवून आरामखुर्चीं टाकून वर्तमानपत्रें वाचण्यांत गढलेला आढळावयाचा; त्याचाही पत्ता लागेना. मला शंका आली. बुचकळ्यांत पडलों. नानानें बिऱ्हाड तर बदललें नसेल ? चौकशी केल्याशिवाय टांग्यांतलें सामान उतरायचें नाहीं, टांगा सोडायचा नाहीं, असें तडकाफडकीं ठरवावें लागलें. आंत शिरून चौकशी केली. कोणी भेटेना. भेटलेलें बोलायला तयार होईना. माझ्याकडे तिरस्काराच्या दृष्टीनेंच जो तो पाहूं लागला ! आतां काय करावें ? जरा पंचाईत पडली ! अजून उभाच होतों मी त्या घराच्या उंबरठ्यांत. तेवढ्यांत शेजारच्या घरांतून एक चलाख पोऱ्या बाहेर पडून सायकलीवर टांग

टाकण्याच्या तयारींत होता, त्याकडे माझी दृष्टि गेली; तसेंच त्यानेंहि मजकडे पाहिलें. नानाबद्दल त्याला तरी विचारावें असें माझ्या मनांत येतें न येतें तोंच त्यानें मजकडे पाहात हंसतमुख केलें. त्यानें मला ओळखलें असावें. मी मागील खेपेला नानाकडे गेलों असतां, त्याच्याकडे नेहमीं येणारा तो मुलगा असावा. मीं विचारण्यापूर्वीच त्यानें मला 'नमस्कार' तोंडानें उच्चारीत आणि किंचित मान झुकवीत विचारलें, "फडणीस मास्तरांच्याकडे आपण आलांत ना ?— ते आतां या जागेंत राहात नाहींत, दुसरीकडे त्यांनीं आपलं बिऱ्हाड बदललं आहे. आपल्याला त्यांनीं कळविलं नाहीं वाटतं ? चला, मी आपल्याला त्यांच्या बिऱ्हाडाकडे घेऊन जातों. त्यांच्याकडेच मी निघालों आहें."

अशा रीतीनें माझें अचानक काम झालें. तो पोऱ्या मला देवच वाटला. मनःपूर्वक त्याला धन्यवाद देत टांग्यांत मी पुन्हा चढलों. पोऱ्यानें आपली सायकल पुढें काढली. टांगा मागून चालूं लागला. सावकाश चालवीत होता तो आपली सायकल. कारण नसतां माणुसकी दाखवून पोऱ्यानें आपलें सहाय्य दिलें मला, याबद्दल मनाला जितका आनंद झाला, तितकाच संताप त्या सुंदर दिसणाऱ्या घरातल्या— मला उमेटपणानें वागविणाऱ्या— दुष्ट माणसाबद्दल आल्याशिवाय मला राहिला नाहीं. वेळ निघून गेली. सुखरूपपणें नानाच्या नव्या बिऱ्हाडांत एकदांचा दाखल झालों !

प्रवासाला निघल्यापासून तो संपेपर्यंत लहानमोठ्या अडचणी प्रत्येकाला येत असतात. थोडाफार त्रास होतोच. त्यावेळीं मन त्रासलें तरी नंतर त्या अडचणींची— त्रासाचीहि— मनाला मोठी मौज वाटते. प्रवासांतील अडचणी— त्रासापासूनहि कांहीं तरी नवीन शिकण्यासारखें— निदान विचाराला कांहीं तरी चालना देणारें तरी— मिळतेंच मिळतें, यांत शंका नाहीं.

आगगाडींत आणि नानाच्या पहिल्या घरीं जे चमत्कार घडले त्यावर वरीलसारखे तात्त्विक विचार मनांत येऊन त्यावरच जास्त चिकित्सा मन करूं लागावयाचें खरें; पण त्यापूर्वीच नाना फडणीस समोर दिसला. मला पाहून धावत पुढें आला; त्यानें स्नेहभरानें मला कडकडून मिठी मारली. जीवाशिवांच्या आनंददायक भेटींत बाकीच्या गोष्टी दाही दिशांना उधळल्या !

" नाना, पहिली चांगली जागा सोडून ही असली गचाळ जागा कां पसंत केलीस रे ? " पहिली नानाची जागा खरोखरच प्रशस्त, हवाशीर, आकर्षक, पाहाणाराच्या आणि माझ्यासारख्या नानाकडे येणाऱ्याच्या एकदम मनांत भरण्यासारखी होती. तिच्या मानानें आतांची जागा अगदींच कसली तरी, बेंगरूळ होती. नानासारख्या रसिक, झोकनोकांत वागणाऱ्याला न शोभेशी ही जागा असल्याचें लक्षांत घेऊन नानाला मीं सहज हंगत विचारलें आणि पुढें म्हटलें,

" उकिरड्यांत हिरा पडावा तसा या जागेंत तूं पडल्यासारखं मला तरी वाटतं. "

" ती जागा माझ्या बापजाद्यांची मिळकत होती थोडीच ! आणि ती काय वारसा हक्कानें माझ्याकडे आली होती ? आणि ही तरी काय मीं विकत घेतली आहे ? तीही भाड्याची आणि हीसुद्धां तशीच ! " नाना हंसण्याचा देखावा करीत म्हणाला, " अरे बाबा, भाड्याचं घर आणि खालीं कर ! हें आमच्यासारख्याच्या परिस्थितींत असणारांच्या नशीबीं नेहमींच आहे ! दुसऱ्याची बायको कितीही देखणी असली आणि आपल्याला ती हवीशी वाटली तरी तिचा लोभ धरतां येत नाहीं; ती कधीं मिळत नाहीं. तसंच भाड्याच्या चांगल्या जागेसंबंधानेंही म्हणतां येईल ! " जरा कडवटल्या बुद्धीनें आणि संत्रस्त स्वरानें नानानें हें म्हटलें असे मला वाटलें.

" पण ती जागा खरोखर सुंदर होती, हें तर खरं ना ? " मीं पुन्हां म्हटलेंच.

" पण पुष्कळ सुंदर गोष्टी आनंददायक होतात असं नाहीं, हें देखील तितंकच खरं ना ? " नानानें प्रश्नाचें उत्तर मला प्रश्नार्थकच दिलें, आणि मी बुचकळ्यांत पडलों.

" ती जागा तूं कां सोडलीस ? ती सुंदर जागा तुला सुखदायक झाली नाहीं ? " मीं आणखी विचारलेंच. ती जागा मला आवडली होती; ही जागा आवडली नाहीं. आणि नानाला ही जागा खरोखरीच शोभण्यासारखी नव्हती. ती चांगली जागा त्यानें का सोडली, याचा त्यानें खुलासा करावा, या बुद्धीनेंच मीं विचारण्याचें धाडस केलें.

आम्ही गप्पासप्पा करीत बसलों होतों. बोलतां बोलता सहजगत्या घराचा विषय निघाला. मी चुकून त्या पहिल्या घरीं गेलों, तेथें माझी फजिती झाली, त्यावेळीं बिऱ्हाड बदलल्याचें नानानें कळविलें नव्हतें, म्हणून त्याचा राग मला आला, ही सारी मळमळ मला नानाजवळ ओकून मोकळें व्हावयाचें होतें. तें विचारण्याच्या हेतूनें विषयाला आरंभ झाला आणि विषय भलतीकडेच वाहात चालला. नानानें पहिलें बिऱ्हाड कां सोडलें, हें त्याच्याकडून कळल्याशिवाय मला मूळ पदावर येतां येणें अशक्यच होतें.

नानाच्या सुंदर बिऱ्हाडाचा विषय मीं काढावयाला आणि त्याच वेळीं त्याच्याकडे एक मनुष्य यावयाला एकच गांठ पडली.

तो मनुष्य मराठा जातीचा होता. वय तिशीच्या आंतबाहेर असेल. काळा-सांवळाच, मूळची त्याची अंगकाठी चांगली सशक्त, पिळदार आणि जोमदार असावी. पण या वेळीं — मीं त्याला पाहिलें त्या वेळीं — तो बराच खराब झालेला होता. निस्तेज दिसत होता. दाढी दोनदोन बोटें वाढलेली, डोक्यावर जंगल तसेंच राठ. कंबरेला करगोटा आणि लाज राखणारी मळकट लंगोटी. शरिरावर फाटकेंतुटकें, जाडेंभरडें,— तेंही शेंकडों ठिकाणीं फाटलेलें— आखूड धोतर कसें तरी एका खांद्यावर टाकलेलें; असा त्या तरुण गड्याचा वेश दिसला. डोळे अगोदर पाणीदार असतील. मोठेही होते. पण त्यांतलें पाणी आटलें होतें. मुद्रा दीन, केविलवाणी, गरजू आणि पश्चात्तापदग्ध अशीच मला वाटली !

तो जो आला, त्याबरोबर त्यानें नानाचे एकदम पाय धरले !

“ मास्तर, माफ करा. म्या तुमचा मोठा गुन्हा कयेला ! मी पापी. मी चांडाळ ! मी हलकट ! तुमच्यासारख्या देवमाणसाच्या अंगावर हात टाकला ! देवानं त्येच्यापायीं मला शिक्षा बी दिली ! शिक्षा सोसली मीं. वाईट नाहीं वाटलं मला ! शिक्षा भोगून आलों तरी माझ्या मनाला समाधानी नाहीं. आपले पाय धरल्याबिगर, आपण तोंडानं माफी दिली असं ऐकल्याबिगर मला समाधानी कशी मिळतीया ? अडाणी बोलूनचालून मी ! चूक झाली. अन्याय झाला माझ्या हातनं ! लोकांचं ऐकलं. चुकलों मी ! मला माफी म्हणा. त्यापायीं मी आलों, —— तुरुंगातनं सुटलों तो देवाच्या दारीं

डोकं पायावर ठेवाया आदुगर हातं आलों. बघा ! चाकरी गेली ! जन्मातनं उठलों. तुम्हीं मास्तर माफी म्हटलं म्हंजी संमदं भरून पावलों बघा ! कुठं बी भीक मिळेल मला. मला लोक भीक घालत्याल ! भीक मागून पोट भराया मला लाज वाटायची नाहीं ! म्हणून इनंती करतों.-- मला माफी म्हणा मास्तर ! मी तुमचं लेंकरूं हाय !--" तो तरुण नानाच्या पायांवर अश्रूंचा अभिषेक करीत होता. तोंडानें एकसारखा बोलत होता. त्याला बोलावत नव्हतें. कंठ दाटून येत होता. शब्द उमटत नव्हते. तरी तो क्षमा-याचनेची विनंती पुनःपुन्हां करीत होता.

नानाकडे आणि त्या तरुण मराठा गड्याकडे चकितमुद्रेनें मी नुसता आ वासून पाहातच राहिलों.

नाना गदगदल्या स्वरानें त्याला म्हणाला, " ऊठ, भिमू उठ ! मी तुला केव्हांच क्षमा केली आहे वेड्या ! ऊठ !" त्याला दोन्ही हातांनीं नानानें उठविलें. अतिशय ममतेनें त्याच्या पाठीवरून हात फिरविला. भिमूच्या डोळ्यांतून तेवढ्यानेंच पाण्याचा पूर वाहूं लागला !

" भिमू, तुरुंगांतून सुटून आल्याबरोबर मला भेटायला आलास --"

भिमूला बरें वाटावें म्हणून नाना खऱ्या सद्भावानें बोलूं लागला त्याच्याशीं.

" तूं सुटून आलास, मला भेटलास याबद्दल मला खरोखरच बरं वाटलं ! पण तुझी तुरुंगानं ही अशी दुर्दशा केलेली पाहून मला फार वाईट वाटतं. काय रे ही दशा झाली ! वाईट वाटतं मला. आणि याला कारण मी झालो."

" नाहीं नाहीं ! नाहीं मास्तर, माझ्या या दशेला तुम्हीं कारण नाहीं. माझा मीच. माझी चूक, माझं पाप. माझा गाढवपणा ! माझं अडाणीपण !" भिमू बोलत सुटला, " मास्तर, तुम्हीं माझ्यावर फौजदारी केली. खटला भरला. तुरुंगात घातलं ! पण तुमचं म्हणणं खरं होतं. तुमची चूक नव्हती ! तुम्हींच खटला भरला-- आणि खटला चालला त्या वक्तीं तुम्हीं माझ्याच वतीनं कोर्टाला ' या पोरावर दया करावी ' अशी विनंती केली !— म्हणून थोड्यावर निभलं. थोडी शिक्षा कोर्टानं मला दिली. मी बचावलों. जिवंत राहिलों. सुटून तुमच्या पायांपाशीं आलों. आणि ज्यांच्या वतीनं मीं तुमचा

गुन्हा केला,–त्यांनीं मला सोडलं– टाकलं. चाकरीवरनं कमी केलं. माझ्याकडे ढुंकून बघितलं नाहीं. ही अशी दुनिया आहे, नव्हं ? तुम्ही माझे,–शिक्षा दिली तरी बी—देव झाला ! मीं ज्या लोकाना देव मानलं, ते राक्षस ठरले.–वेताळ निघाले ! देव त्या लोकांना—”

भिमू पुढं त्या लोकांना काय शिव्याशाप देणार होता देव जाणे ! नानाच्या तें लक्षात आलें असावें. त्यानें त्याला पुढें बोलूं दिलेंच नाहीं. विषयच बदलून टाकला. नाना भिमूला म्हणाला, “ भिमू, तूं अडाणी असलास तरी जगात सज्जन कोण, दुर्जन कोण हें तुला समजलं. हें कळायला प्रायश्चित जरा कडक मिळालं हें खरं; पण त्याला माझा किंवा कोणाचाच इलाज नव्हता ! आता पुढं तुझ्या पोटाची व्यवस्था काय ? तुला चाकरी देऊन पदरीं ठेवावा अशी माझी स्थिति नाहीं, हें तुला माहीत आहे. नाहीं तर मींच तुला जवळ बाळगून तुझ्या पोटाची सोय लावली असती. ”

नंतर नाना उठला. खुंटीवर अडकविलेल्या कोटांतून त्यानें पांच रुपयांची नोट काढली आणि ती भिमूला देत म्हटलें, “ भिमू, ही एवढीच तुला मदत करायची माझी शक्ति आहे. कोर्टानं दंड नाहीं तर तुरुंग, अशी तुला शिक्षा फर्मावली. त्या वेळीं मला वाटलं कीं, तुझा दंड मींच भरावा आणि तुझ्या कपाळीं येणारी तुरुंगाची शिक्षा टाळावी. पण दंडाची रक्कम भरायला माझ्या शक्तीच्या बाहेरची होती, म्हणून माझा नाइलाज झाला ! तुला तुरुंग पाहावा लागला. हे पाच रुपये घे. त्यावर निघतील तितके दिवस काढ. कुठंही चाकरी मिळविण्याची खटपट कर. माझ्या शिफारशीची गरज वाटली तर माझ्याकडे ये. मी शिफारसपत्र तुला जरूर देईन. कायद्याचं काम कायद्यानं केलं. माणुसकीचं काम माणसानं केलंच पाहिजे !...”

पांच रुपयांची नोट त्याच्या हातांत देत नाना भिमूशीं वरीलप्रमाणें बोलला. भिमूला अत्यानंद झाला. आनंदानें फुलून जाऊन तो रडूं लागला. पुनः पुन्हा नानांचे पाय घट्ट धरूं लागला तो. त्याला काय बोलावें आणि काय नको, असें होऊन गेलें. त्याला बोलवेना ! कृतज्ञतेच्या दृष्टीनें भिमू नानाकडे पाहात राहिला ! “ कृतज्ञता ” ह्या शब्दाचा खरा अर्थ तेव्हां मला

भिमूच्यामुळें कळला ! कृतज्ञता मूर्तिमंत कशी असते, हें भिमूच्या नेत्रांत मला त्या वेळीं दिसलें !

नानांचा निरोप घेऊन व ' पुन्हा येत जाईन. गरिबावर दया असू द्या–' अशी विनवणी करीत भिमू निघून गेला.

* * *

" कुलकर्णी, तूं ज्या माझ्या सुंदर जागेची मुक्तकंठानं स्तुति करीत होतास, त्या सुंदर घरामुळंच या भिमूला जन्मांतून उठवून भिक्षा भोगण्याची पाळी आली,– याला तुरुंगाची हवा खावी लागली, बरं का ? " भिमूच्या वाटेकडे किती वेळ तरी हेतुशून्य दृष्टीनें पाहात असलेल्या नानानें माझ्याकडे वळून म्हटलें. त्याच्या मस्तकांत त्या वेळीं कितीतरी मागल्या त्रासदायक घटना पुनःपुन्हा जाग्या होऊन त्याला अस्वस्थ करीत होत्या. अंतरगांतल्या विचारा–विचाराचा स्पष्ट ठसा मुद्रेवर दिसत होता.

" म्हणजे काय ? " असा प्रश्न नानाला मीं केला नाहीं. फक्त प्रश्नार्थक मुद्रेनें त्याच्याकडे पाहात राहिलों.

" आणि माझ्या घराण्याच्या पूर्वपुण्याईनं मीही थोडक्यांत बचावलों. प्राणावरचं शेपटीवरच गेलं म्हणेनास ! नाहीं तर, जी गत त्या सुंदर घरानं भिमूची केली, त्या पेक्षांही दारुण अवस्था तुझ्या या नाना फडणिसाची झाली असती ! तसं झालं असतं तर हा नाना, या तुला पसंत न पडलेल्या गचाळ जागेंतही न सांपडतां तुरुंगाच्या आवारांत–हातापायांत कड्या अडकवलेल्या–कैद्याच्या पोषाखांतच पाहावा लागला असता ! " नानानें किंचित् रुक्ष हास्य करीत सांगितलें.

" म्हणजे काय ? म्हणतोस तरी काय, नाना ? " एकदम झोपेंतून खडबडून जागा होऊन घाबरटपणानें विचारावें, तशा आवाजांत मी म्हणालों.

" ती सारी कथाच ऐक. मी तुला एकदां पत्रानंच लिहून कळवणार होतों. पण आतां समक्षच ऐक. सांगण्यासारखी सुरम्य –– आल्हाददायक कथा नाहीं. पण तुला सांगायला हरकत नाहीं. शक्य तितकी थोडक्यांतच तुला ती सांगतों. " अशी प्रस्तावना थोडक्यात करून नाना मला व त्यालाही

एकाकाळीं आवडणाऱ्या त्या सुंदर घराच्या परिसरांत घडलेली चमत्कारिक कथा सांगूं लागला.

मीं मनाचे कान आणि देहाचें भान करून नाना काय सांगणार तें ऐकण्याची तयारी केली. नाना सांगूं लागला,—

" त्या घराचा धनी एक उतार वयाचा धनिक आहे. त्याला दोन ऐन उमेदींत आलेलीं— बरोबरीचींच म्हणेनात— मुलं आहेत. पांचवी किंवा सहावी असेल,— त्या धनिकाची तरुणी साधारण देखणी म्हटलं तरी चालेल, अशी एक पत्नी आहे.

" घरधनी तसा मनानं आणि वागणुकीनं भलाच आहे. मुलंही कांहीं तशी अगदींच हीं नाहींत. शिकलेलीं आहेत थोडीफार—

" बायको तरुणच आहे, पोरसवदा आहे. मूळची चवचाल, वांकड्या चालीची नव्हे. पण नवरा म्हातारा. त्यात लग्न करून घेतल्यानंतर थोड्याच दिवसांत त्याला पक्षघातानं पछाडलं. अर्धं आंग निकामी होऊन तो अंथरुणाला खिळला. शारीरिक सुख घ्यायला आणि द्यायला सर्वस्वी निरुपयोगी झाला. अशा स्थितींत ती अल्लड तरुणी – अननुभवी – भावनावश झाली, इकडे तिकडे सुख मिळतं काय याचा शोध करूं लागली – मिळवूं लागली, तर तिला कोणता सहृदय गृहस्थ दोष देईल ? कोण तिची अब्रु चवाठ्यावर आणण्याचा पाजीपणा करील ?

" तिची वागणूक तिच्या मुलांना माहीत झाली. नवऱ्याला कळली. कित्येक गोष्टी त्याला आपल्या दृष्टीसमोर चाललेल्या दिसत. त्याला तें असह्य होई ! तो जळफळे, तडफडे. कासावीस होई. पण करणार काय ? दोष देणार कोणाला ? तिला बोल लावीत नसे. तिला चकार शब्द बोलत नसे. सर्व चुका आपल्या आहेत— आपण पैशाच्या जोरावर तिला आपलीशी केली, आपलं सुख पाहिलं. तिच्या दुर्दैवानं आणि आपल्या कमनशिबानं आपण असे पंगु झालों— ही कल्पना त्याला होती. म्हणून तो स्वतःवरच वैतागे. संतापे ! आपली अब्रू चवाठ्यावर अजून जात नाहीं,– 'घराबाहेर' पडून ती वाटेल तसा स्वैराचार करीत नाहीं– यांतच तो समाधान मानण्याचा प्रयत्न करी !

“ माझ्याशीं तोही बोले. तीही बोले. मुलंही बोलत. मी सर्वांशींच बोलें. आता गेला तो भिमू त्याच्या घरीं नोकर होता. सकाळ–संध्याकाळ तास दोन तास, लहानसा ढकलगाडा केला होता, त्या गाड्यावरील खुर्चीवर बसवून भिमूनं घरमालकाला दूरवर फिरवून आणायचं, हे त्याच्याकडे मुख्य काम होतं. भिमूनं मालकाला फिरायला नेण्याच्या वेळात त्याची पत्नी आपल्या जिवाच्या सुखाची प्राप्ति होते काय, हे पाही.– मिळवी. कोण तिच्याकडे येत आणि कोण जात; याची कल्पना किंवा माहिती किती दिवस तरी मला मुळींच नव्हती. त्यावर लक्ष ठेवण्याचं मला कारणही नव्हतं. इतकंच काय, पण ती चालीची कशी आहे, याचा विचारही मला कधीं आला नव्हता ! ”

“ नीतिबोधाचं शिक्षण देणारा तूं मास्तर ना ? तुझ्या ध्यानांत तें कसं येणार ? तूं लक्ष तरी कसं घालणार ! ” मी मध्येंच म्हणालों.

नाना पुढें सांगूं लागला, — “ घरीं मुलं नाहींत, मालकाला भिमूनं फिरायला नेलेलं, अशा एकदोन वेळीं काहीं कामाचं निमित्त करून तिनं मला हांक मारली. मी हातातील काम बाजूला ठेवून तिच्याकडे गेलों. बोलावण्याचं कारण विचारलं. मुख्य कामाचा ठिकाणा लागेना. ती इकडच्या तिकडच्याच गोष्टी बोलूं लागली, – बरळूं लागली म्हणेनास ! परकी पुरुषासमोर कुलीन बायका बोलूं शकणार नाहींत, तसले विषय ती बोलायची. माझ्याकडे टक लावून पाहायची. मध्येंच रडूं लागायची. भावनावश होऊन जमिनीवर पडायची. मी त्याच घरीं राहायला गेल्यावर विधुर झालों होतों. माझ्या एकाकी आयुष्याबद्दल ती गोष्टी काढायची. ‘ तुमचं तसं आणि माझं असं. आपण दोघेही दुर्दैवी जीव आहोंत, ’ असंही म्हणून, मी त्यावर काय उत्तर देतों, याकडे आशाळभूत दृष्टीनं आणि मनानं लक्ष द्यायची ! कुलकर्णी, त्या त्या वेळीं मला काय वाटलं असेल, मी कसा वागलों असेन, अशी तुझी कल्पना आहे ? ”

“ पापाचरणाचा विचार तुझ्या स्वप्नींही येणं शक्य नाहीं, मग प्रत्यक्ष कृतीची गोष्ट कशाला ? ” मीं ठासून आपलें मत व्यक्त केलें.

नाना त्यावर हंसला आणि म्हणाला, “ वेडा आहेस ! माझं मनही न चळायला मी काय शुकमुनी आहे ? माझं मन चळलं. मोहाच्या आहारीं

जाऊं लागलं. शरीरानं तर ताळ सोडायची वेळ आणली एकदां ! तरुण स्त्री आपल्यावर अनुरक्त आहे असं पाहिल्यावर जो चळणार नाहीं, तो 'मुक्त' च म्हटला पाहिजे ! त्या कोटींतला मी आहें थोडाच ?—"

"मग काय ? तूं तिच्या भावनेला वश झालास नाना ?" किती घाईनं आणि घाबरटपणानें मीं त्याला विचारलें !

"मनानें चळलों." नाना म्हणाला, "—घाबरूं नकोस. शंका घेऊं नकोस. पण मीं शरीर पाक राखलं. स्वतःला आवरलं. अधिकाराचा उपयोग करून तिला सावरलं. पुन्हां तिला टाळण्याचा,— तिनं बोलावलं तरी, ती एकटी असताना, तिच्याकडे न जाण्याचा पक्का निश्चय करून अंमलात आणला. मीच काय, पण माझ्या मुलांना खालच्या त्याच्या जागेंत खेळायला देखील जाऊं द्यायचं नाहीं असं ठरवून टाकलं. माझा खाजगी क्लास. त्यात घरंदाजांचीं, मोठ्यांचीं, कुलीनांचीं जाणतीं मुलं आणि मुलीही येणार. त्याना शिकवणारा मी. माझं चारित्र्य शुद्ध ठेवणंच माझं कर्तव्य होतं. मीच बिघडलों, चळलों, तर विश्वासानं माझ्याकडे आपल्या मुली शिकायला धाडणार कोण ? या भीतीला मी घाबरलों म्हण पाहिजे तर ! पण भ्यालों म्हणूनच शुद्ध राहण्याची बुद्धि मला झाली. मी व्यवस्थित वागूं लागलों."

"मग पुढं काय झालं ? ती बाई जास्त त्रास देऊं लागली, म्हणून तूं जागा सोडलीस कीं काय ?" मीं उत्सुकतेनें विचारलें.

"ऐक तरी ! आपोआप तें तुला कळेलच. घाई कां ?" नानानें पुढं चालू केलें, "मी तिला प्राप्त झालों नाहीं, तरी ती आपल्या सुखाचा शोध लावून त्याची प्राप्ति करून घेतल्याशिवाय राहणार थोडीच ?"

"घरमालक अर्धांगाच्या झटक्यानें अंथरुणाला खिळला हें कळल्यावर उद्योगानिमित्त बाहेर चैनींत हिंडत असलेलीं मुलं घरीं आलीं. वडिलांनी उतारवयांत लग्न केलं याबद्दलच त्यांचा त्याच्यावर रोष झाला होता. त्यात मुलांचा त्रास आपल्या अर्धांगीला होऊं नये म्हणून, म्हाताऱ्यानं आपल्या मिळकतीची योग्य वांटणी करून मुलांना दिली. आपल्या पश्चात् आपल्या पत्नीला अन्नाकरितां दारोदार हिंडण्याची वेळ येऊं नये म्हणून तिच्याही नांवचं कांहीं निराळं करून ठेवलं. मी त्याला भला म्हणतों तो याचसाठीं.

" मुलांना तें आवडलं नाही. तिची बेअब्रू चवाठ्यावर आणावी, तिची नाचक्की करावी, घरांतून तिला हुसकून लावावी, आणि तिला दिलेलं आपल्या खातीं जमा करावं, अशी मुलांनीं इच्छा बाळगली. तिची निंदा—नालस्ती--कुचाळकी प्रत्येकाजवळ त्यानीं चालू केली. बापालाही उठल्याबसल्या वाटेल तें बोलून हैराण करण्याचं कंकण बांधलं.

" साळसूदपणानं ते माझ्याशीं बोलायला येत. आणि आपल्या सावत्र आईच्या अनैतिक वागण्याच्या अनेक गोष्टी तिखटमीठ लावून मला ऐकवीत. मी एकदा दोनदां ऐकून घेतां असं पाहून आपल्या पोटातला हेतु त्यानीं मजजवळ व्यक्त केला; तिला घरांतून हुसकून लावण्याच्या बाबतींत माझ्याकडे सहाय्य मागितलं.

" कायद्यानं तें होण्यासारखं होतं; पण माणुसकीला मात्र मुकविणारं होतं. मला त्या बाईचे आजचे चाळे पसंत नव्हते. पण तिचा भावी भेसूर काळही दिसत होता. माझी माणुसकी जागी होती. म्हणूनच कायद्याच्या कात्रींत तिचा सत्यानाश होऊं नये असं मला वाटत होतं. म्हणून मी त्या दोघां मुलांची चांगली कानउघाडणी केली. ' ती तुमची सावत्र कां होईना, पण आई आहे. तिच्याबद्दल बोलतांना जिभेला लगाम घालणं तुमचं कर्तव्य आहे. तिला अन्नान्नदशेला न नेणं तुमचा धर्म आहे ! ' असं सागून त्याना वाटेला लावलं. ' पुन्हां हें ऐकवायला माझ्या येथें पाऊल ठेवूं नका. ' असं बजावलं. ते नाराज झाले. रागावले माझ्यावर. मला त्याची पर्वा काय ? "

" योग्य केलंस ! " इतकेंच मीं म्हटलें.

" पुढं एक दिवस म्हाताऱ्याचा प्राण कासावीस झाला. आपण मरणार असंच त्याला वाटलं. मुलं घरात नाहींत असं पाहून आणि पत्नी कामात आहे हें हेरून म्हाताऱ्यानं भिमूकडून मला बोलावलं. घरमालक पडला तो. मला जाणं भागच होतं ! मी गेलों.

" त्यानं मला जवळ बसवून घेऊन आपली, आपल्या मुलांची आणि पत्नीचीही हकीकत साद्यंत सांगितली. आपल्या मुलांबद्दल बोलला. बायकोचं चारित्र्य वर्णन केलं. आपली चूक सांगितली. आणि केलेल्या पापांतून अंशतः मुक्त होण्यासाटीं टरविलेली योजनाही मला सांगितली.

"माझ्याशीं तिनं लगट केल्याचंही तिच्याच तोंडून त्याला कळलं होतं. मीही तिच्याशीं कसा वागलों होतों हेंही त्याला तिच्याचकडून कळलं होतं—तेंही त्यानं बोलून दाखविलं. म्हणूनच माझ्यावरील विश्वास व्यक्त करून त्यानं मला एक महत्त्वाची कामगिरी सांगितली. तिच्यासंबंधीं व्यवस्थापत्रक जें केलं होतं, तें कचेरींत जाऊन कायदेशीर रीतीनं नोंदवून तें माझ्याजवळ ठेवावं आणि आपल्या पश्चात् मीं तिच्याजवळ द्यावं—मुलांना यांतलं कांहीं कळूं देऊं नये, ही ती कामगिरी होती.

"मीं ती मान्य केली. त्याचं काम केलं. तें तिला कळलं, तेव्हांपासून ती माझ्याशीं आदरानं वागूं लागली. मी तिचंही विश्वासाचं स्थान बनलों. वेळोवेळीं ती माझ्याकडे वर येऊन घटकान् घटका बसून बोलूं लागली!"

"बरं झालं. छान केलंस!" मी मध्येंच म्हणालों.

"छान झालं रे! पण त्याबद्दल मला एका पेंचप्रसंगांत पडण्याची पाळी आली!" नाना म्हणाले.

इतकें चांगलें वागणाऱ्यावर पेंचप्रसंग! मला मोठा प्रश्नच पडला. नाना पुढें काय सांगणार, त्याकडेच माझें सर्व लक्ष वेधलें. नाना सांगत असतां, ते सुंदर घर, त्यांत भेटलेली बेपर्वा मंडळी, हीं माझ्या डोळ्यांसमोर येत होतीं. ती चवचाल बाई मला कधीं दिसलीच नव्हती. पण तीही कशी असेल? असली स्त्री कशी असूं शकते? दिसते कशी? चालते कशी? बोलते कशी? इत्यादि विचार येऊन डोळे तिला पाहाण्याकरितां धडपडत होते माझे! मनुष्यस्वभावच असा असतो, नाहीं का?

* * *

नानानें त्या म्हाताऱ्याचें म्हणणें मान्य करून आपल्या कृतीनें त्याच्या अंतरात्म्याला समाधान दिलें. माणुसकीला जागून, त्याच्या पत्नीचेंही थोर मनानें कल्याण साधलें. ही गोष्ट लवकरच म्हाताऱ्याच्या मुलांना कळली. त्यांचें माथें भणाणलें. त्यांनीं नानावर वक्रदृष्टि ठेविली. ती नानाकडे भेटायला जाते, बोलत बसते, असें हेरून तिचा आणि नानाचा अनैतिक संबंध असला पाहिजे असें ठरविलें,—नसला तरी तो त्यांच्यावर लादला.

 

भिमूला त्यांनीं विश्वासात घेतला. त्याला पैशाची लालूच दाखविली. नानाच्या पाळतीवर त्याला ठेविलें. आणि संधि साधून नानाला खोड्यात अडकविण्याचा त्यानीं घाट घातला ! भिमूला पुढें केलें. आपण त्याच्या मागें राहिले. ते संधि पाहू लागले, पण नाना त्यांना कोठेंच सांपडेना. ते चिडले. निराश होण्याच्या बेताला आले. पण त्यांना दम निघेना.

शेवटीं कुरापत काढण्याशिवाय त्यांना दुसरा मार्ग सांपडेना. एक दिवस नानाचा क्लास चालला असता, नाना चिडेल अशी कुरापत भिमूला काढायला लावली. त्यानें कुरापत काढली. नाना त्याला समजून सांगूं लागले. पण त्याची समजूत कशी पटणार ? चढेलपणानें नाना बोलतो असें भासवून भिमू भर क्लासात शिरला. नानांजवळ गेला, आणि, " कोणाला रे मास्तरड्या अरेतुरे करतोस ? याद राख ! तोंड संभाळून बोल. " असा आपणच आरडाओरडा करीत, विद्यार्थी-विद्यार्थिनीदेखत भिमूनें नानाच्या श्रीमुखात खाड्कन् भडकावली ! नानानें हे मला सांगितलें तेव्हा ती श्रीमुखांत आता माझ्याच बसल्यासारखें मला झाले ! मला घेरी आल्यासारखें झालें !

विद्यार्थी-विद्यार्थिनींदेखत अशी बदनामी होणें ही गोष्ट समाजांत कमीपणा आणणारी असल्यानें नानाला आपली अब्रू संभाळणें— साफ ठेवणें— भागच होते. स्वस्थ बसावें तर त्याच्याबद्दल नसत्या कंड्या पिकवून त्याला जगांतून उठवायला त्या म्हाताऱ्याचीं अविचारी कार्टीं एका पायावर तयारच होतीं. नानाला नाइलाजानें भिमूच्या विरुद्ध फौजदारी करावी लागली. फौजदारी केली. भिमूला पकडून नेण्यात आलें. खटला भरला गेला. कोर्टांत खटला उभा राहिला.

मध्यंतरी काय, कसें झालें कोण जाणे. भिमूला पकडल्यानंतर त्या मुलानीं त्याला सोडलेच. त्याला आधार दिला नाहीं. पैशाचें सहाय्य केलें नाहीं, आणि चाकरीवरूनही कमी केलें. भिमूचें तोंड चिमणीएवढें झालें. त्याच्या तोंडीं राळे वाळले. तो दीन-असहाय्य झाला ! आतां त्याचे डोळे उघडले. पण उपयोग काय ? वेळ निघून गेली होती.

भिमूनें अविचाराचें कृत्य केलें ते कांहीं स्वतःच्या बुद्धीनें नव्हे, तर त्याचे बोलविते धनी निराळे होते, हे नानालाही माहीत होतें. खटला भरल्यावर

नानालाही वाईट वाटलें. कोर्टात उभें राहिल्यावर दीन, गोगलगाय झालेल्या भिमूला पाहून नानाचें हृदय द्रवलें. त्याची जबानी झाली. त्यांत, 'भिमू खरा अपराधी नाहीं. खरे अपराधी सुटले, दडले. गरीब आहे तो. कोर्टानें त्याला सोडून द्यावें. दया करावी. शिक्षा दिलीच तर शक्य तितकी कमीच द्यावी.' असेंच उलट नानानें सांगितलें. त्याची माणुसकी त्या वेळींही जागीच होती.

'हा विचित्रच फिर्यादी आहे!' असेंच नानाबद्दल लोक कुजबुजूं लागले. भिमूला अखेर रीतसर शिक्षा झाली! पण नानाबद्दल भिमूचेंही मत भर कोर्टातच बदललें. त्यानें जातां जातां ज्या कृतज्ञ दृष्टीनें नानाकडे पाहिलें, त्यामुळें नानाला गहिंवर आल्याशिवाय राहिला नाहीं.

नानाची माणुसकी पाहून कायद्यालाही आपलें स्वरूप शक्य तों सौम्य करावें लागलें. माणसाकरिता कायदा असतो, कायद्याकरितां माणूस नाहीं, हें पुन्हां एकदां सिद्ध झालें.

म्हाताऱ्याच्या मुलांचा डाव आपल्या सावत्र आईवर आणि नानावर बालंट आणून दोघांनाही कायद्याच्या सहाय्यानें तुरुंग दाखविण्याचा होता. पण तो त्यांना साधतां आला नाहीं. त्यांना धैर्यच झालें नाहीं, इतकें खरें! त्याचा डाव साधला असता तर? कायद्याकरितांच माणूस असतो, हें सिद्ध झालें असतें. नानाला तुरुंगांत भेटावयाला जाण्याचा प्रसंग माझ्यावर आला असता!

तें सुंदर, देखणें, हवेशीर, शोभिवंत घर नानानें कां सोडलें हें नानाला विचारण्याचें आतां मला कारणच उरलें नाहीं! आणि इतरांना तरी कारण कुठें उरलें?

नानानें साद्यंत हकीकत सांगितली. माणुसकीला दुखविणारें, केवळ कायदाच पाहाणारें घर नानांनीं सोडलें. प्रवासांत मला माणुसकी दाखविणाऱ्या रेल्वे अधिकाऱ्याच्या माणुसकीशीं नानानें भिमूला दाखविलेल्या माणुसकीची मी मनांतल्या मनांत तुलना करूं लागलों. आमचा नाना त्या अधिकाऱ्याच्या मानानें किती उंच– हिमालयामारखा– वाटूं लागला! मला

आनंद वाटला ! नानाला शतशः धन्यवाद देऊनही माझी तृप्ति झाली नाहीं. कशी होणार ?

माणुसकी आणि कायदा यांतला तरतमभाव जाणून त्याप्रमाणें वागणारीं नानासारखीं माणसें किती असतील ?

---

# सलणारें सौख्य : २

व्यक्तीची आवड, समाजाची निवड आणि व्यवहारी बडबड या तिहींचा समन्वय झाल्यास व्यक्तीची उन्नति आणि समाजाची प्रगती होईल, असें कांहींना वाटतें; आणि त्याकरितां प्रामाणिक, अप्रामाणिक असे प्रयत्न चाल-लेले असतात ! पण तसें कधीं होत नाहीं, आणि कोणाची कुरबूर कधीं संपत नाहीं.

व्यक्तीची आवड नेहमींच गैरवाजवी असते असें नाहीं. समाजाची निवड सदैव सत्यान्वेषणाची— असेंही नसतें, किंवा व्यवहाराची बडबड साधार नीं हितपरिणामी असेलच हें तरी कोण सांगणार ?

तिहींतील दोघांचें संगनमत कधीं होतें, कधीं होत नाहीं. तिघांत तिवाटा होताल. दोघांचें संगनमत झालें तर एक असंतुष्ट राहिल्याचें दिसतें. तसेंच तिहींचा बळजबरीनें समन्वय घालणाराची तर त्रेधातिरपीटच बहुधा उडाल्या-शिवाय राहात नाहीं !

श्रीमंत भाऊसाहेब सुमंत या ताज्या रक्ताच्या, उमद्या स्वभावाच्या आणि दिलदार मनाच्या तरुणाला असाच कांहींसा अनुभव मिळालाच ना ?

भाऊसाहेब सुमंताच्या पायांशीं वडिलार्जित लक्ष्मी अष्टौप्रहार लोळण घेत होती. खुषीचें वडिलाचें कृपाछत्र निर्घृण कालानें काढून टाकलें असलें, तरी

अमृतालाही जिंकणारी गोड गोड अशी, मातेच्या वत्सलतेची वृष्टि अविरत त्याच्या मस्तकीं होत होती ! भाऊसाहेब सुमंतास गृहदेवतेचाही लाभ चागल्याचागल्यांनीं हेवा करावा असाच झालेला होता. तसेंच, संसारसुखाची शीग पुरेपूर भरावी म्हणूनच कीं काय, दोन तीन लडिवाळ, गोजिरवाणीं बालरत्नें– त्यास व घरातील साऱ्याच वडिलधाऱ्या माणसाना सदैव आनंदात राहावयाला भाग पाडणारीं हंसतमुखी बालरत्नें — घरीं अंगणांत रागत होतीं !

स्वार्थी बुद्धीनें स्वतःच्या पोळीवरच तूप ओढण्याकरितां, पायीं लोळत असलेल्या लक्ष्मीला आपली बटीक बनवून धुंदपणानें राबवावी, असें भाऊसाहेब सुमंताच्या मनात कधींच आलें नाहीं. लक्ष्मीला पायाची दासी करण्यात भाउसाहेब सुमंताला निढळाचा घाम गाळावा लागला नव्हता म्हणा हवें तर; तिची त्याला विशेष पर्वाही वाटत नसे, किंवा तिची आराधना करण्यातही वेळ घालविण्याची गरज वाटत नसे. गरजू भेटला, अडलेनडलेला आला, गरीब पण महत्त्वाकांक्षी कोणा प्राण्यानें आर्जवून मागणी केली, तर भाऊसाहेब मुक्तहस्तानें त्या त्या जीवाना आनंदित करण्यातच धन्यता मानी. किती गरीबांना वर आणलें, किती मित्रांना 'गुप्त' हातानें संतुष्ट केलें, कितीकांना घरें बांधून दिलीं, तर कितीकाचीं लग्नें स्वतःच्या खर्चानें लावून देऊन संसार सुरू करून दिले, याची भाऊसाहेबाकडे यादी मागितली तर ती त्याला देता आलीच नसती,– इतकी बेफिकिर वृत्ति भाऊसाहेबाची !

'दानती' संबंधींची आपली व भाऊसाहेबाची निवड एकरूप आहे, असें समाज म्हणत असे कीं नाहीं कोण जाणे ! आणि खरोखर भाऊसाहेबाला ऐकावयाला जाईल इतक्या मोठ्यांदा समाज उद्‌गारत असला, तरी भाऊसाहेबाच्या कानीं ते उद्‌गार शिरत असतील कीं नाहीं, याची वानवाच होती.

समाजाच्या निवडीकडे भाऊसाहेबाचें लक्षही नसे ! आणि लक्ष देण्याची गरजहि त्या प्राण्याला वाटत नसे. मग व्यवहारी बडबड ऐकायला त्या जीवाला फुरसत तरी कुठली, आणि त्यावाचून त्याचें अडतें तरी कशाला ?

वात्सल्याचा सतत अभिषेक मस्तकावर करणाऱ्या माऊलीवर भाऊसाहेबाची तशीच निस्सीम माया असे. तिला सन्मानण्यांत काडीची कसूर नसे.

आणि मनासारखी प्रेमळ अशी गृहदेवता घरभर वावरून आपल्या तेजाचा मंदशीतल प्रकाश पाडीत असतांना तिला अकारण अवमानण्याचे, दुःख देण्याचें, किंवा तिच्या सुखांत व्यत्यय आणण्याचें भाऊसाहेबाला कारण तरी काय ? गृहदेवतेची बूज तो मनापासून राखी. तिचें कसलेंही उणें पडूं देत नसे.

वसंत, कुमार, मधु हीं गोजिरवाणीं बाळें तर भाऊसाहेबाचा केवळ कलिजा ! प्राण ! आपल्या ऐपतीला, आवडीला नी प्रामाणिक बुद्धीला साजेसें आपल्या बालकांचें कोडकौतुक करावें भाऊसाहेब सुमंतानेंच ! हें त्याचें त्याला वाटत असे असें नव्हे; लोकही अनेकदा उघड बोलत. भाऊसाहेबाला भलायकी देत ! पोटच्या पोरांवर प्रेम करायला नी त्याचे लाड करायला सांगावें–शिकवावें लागतें का कोणाला ?

भाऊसाहेबाचा सुंदर संसार अशा थाटामाटाचा, वैभवाचा, चालला असल्यानें– नव्हे भाऊसाहेबानें चालविला असल्यानें— घरांतले आणि घराबाहेरचे आप्तेष्ट, मित्रपरिवार भाऊसाहेबाला ‘ सुमंत ’ घराण्याचें भूषण मानीत. त्याच्या बुद्धीचें, चातुर्याचें, विद्वत्तेचें आणि– सर्वच लहानसहान गुणांचें जेव्हां तेव्हां मनसोक्त गुणगान करीत. भाऊसाहेबाला चढ्वात ! तळहातावर झेलीत ! आणि त्यांत वावगें असें काय होतें ?

पण—

—पण महासागराच्या विशालतेला जसें मापणें अशक्य, तसेंच मानवी मनाचा आवांका मर्यादेत आहे असें मानणेंही वेडेपणाचेंच ! त्या मनाच्या विविध ‘ आवडीं ’चा अंदाज तरी कोणाला लागणार ?

भाऊसाहेब आपल्या जिव्हाळ्याच्या लहानमोठ्या जीवांचा यथासांग परामर्ष घेई, तर त्याला, त्याचा मोबदला म्हणून “ कौतुक ” नी “ आदर ” यांसारखे वेळोवेळीं, क्षणोक्षणीं नजराणेही मिळत.

तरुण वय, रसिक मन, लक्ष्मीची कृपा, सौंदर्यपिपासू हृदय, आणि विश्वांतल्या विविध सौंदर्यस्थानातील– वस्तूंतील– अचूक आणि मार्मिक

रसग्रहण करण्याचें सामर्थ्य; त्या सामर्थ्याच्या जोरावर आवाक्यांतील नव्हे, तर आवांक्याबाहेरील दुष्प्राप्य असें रमणीयत्व प्राप्त करून घेण्याची उपजत आवड. भाऊसाहेबाच्या ठिकाणीं वरील सामग्री भरगच्च होती यांत शंका नाहीं. आणि म्हणूनच 'घराला' संतुष्ट ठेवूनही त्याची 'आवड' आणखीही शिल्लक सांच्यात असावी !

बंगल्यासभोंवतींच्या बागेंत स्वतःच्या मालकीचे गुलाबांचे ताटवे बहरलेले असले आणि त्या फुलांच्या रंगांनीं नेत्रांना आल्हाद होत असला, त्यांच्या सुवासानें मन धुदकारत असलें तरी दुसऱ्या ठिकाणीं हिंडतां–फिरतांना शोभिवंत, सुगंधित फुलें आढळलीं, दिसलीं, मिळालीं, तर तीं घेऊं नयेत, त्यांचा आस्वाद सेवन करूं नये, असें खऱ्या रसिकाला कसें वाटेल ? त्याला कोण अडविणार ? तो कोणाला जुमानणार ?

बाबूराव पेंटर यांच्या कुशल कुंचल्यांतून निर्माण झालेलें अभिनव सुंदर चित्र आपल्या दिवाणखान्यांत लटकलें असलें तरी धुरंधराचें वेंगळ्या तऱ्हेचें आपल्या मनाला मोहित करणारें तसेंच नितांतरमणीय चित्र हस्तगत होण्यासारखें असल्यास तो योग कोण दवडील ?

मास्तर कृष्णरावांचें सुरेल संगीत एकाद्याला हक्कानें केव्हांही ऐकतां येण्यासारखें असलें तरी नटसम्राट् बालगंधर्वांच्या गोड गळ्यांतून निघणारी आकर्षक तान आपल्या कानीं घुमून हृदयाला गारीगार करण्याची सुवर्णसंधि सहज साधण्यासारखी असली, तर कोणता हतभागी जीव ती हातची दवडील ?

" अजुनी कसे येती ना ? " ही राजकवि यशवंतांची आतुर कविता आपल्या जिभेवर आपल्या काव्यगुणांनीं नाचत राहिली, आनंद देण्यास तत्पर असली, तरी माधव ज्यूलिअन यांची 'कंचनी' आपल्या 'रसिक जिभेवर मला स्थान हवं' असें म्हणत, लाजत-मुरडत नखेरलपणानें समोर उभी राहिली, तर तिला अरसिकपणानें दूर लोटावी असें कोणाला वाटेल ?

जगाच्या विशाल बागेमध्यें निर्हेतुक मनानें आणि उल्हसित अंतःकरणानें भाऊसाहेब सुमंत हिंडत असतां एका झाडाखालीं नागचाफ्याचें मोठें घवघवीत फूल त्यांच्या दृष्टीस पडलें. सुंदर नाजुक पांढऱ्या शुभ्र पाकळ्या,

सुवर्णरंगाशीं स्पर्धा करणारे मृदुमृदु केसर, यामुळें नागचाफ्याच्या त्या एकाकी पडलेल्या फुलानें भाऊसाहेबाचें मन पाहतांक्षणींच आपल्याकडे आकर्षिलेंच ! नागचाफ्याच्या त्या फुलाकडे भाऊसाहेबानें पाहिलें. त्याची रसिक आवड जागी झाली. तें फूलही आपल्याकडे पाहात आहे, 'मला उचला, माझा आस्वाद घ्या. आपल्या कोटाच्या बटन–होलमध्यें मला खोंचा.–रस्त्यावर एकाकी आपण आहोंत. कुणी निर्बुद्ध अरसिक बेगुमानपणानें मला पाया-खालीं तुडवील, चुरडून टाकील ! माझा जन्म वांया जाईल !' असेंच जणूं काय तें फूल भाऊसाहेब सुमंताला विनंति करीत आहे, आपल्या भाषेनें बोलत आहे, असा त्याला साक्षात् भास झाला !

*          *          *

भाऊसाहेबांनीं तें फूल चटकन् उचललें ! पटकन् तें हुंगलें. त्यांचें भानच त्याक्षणीं हरपलें ! अत्यंत आपुलकीनें, प्रेमानें, आनदानें आणि जिवंत आवडीनें, भाऊसाहेबांनीं त्या फुलाचा स्वीकार केला. आपल्या कोटाच्या बटनहोलमध्यें लटकावलें. फूल भाऊसाहेबांचें झालें ! भाऊसाहेबांनीं त्या पुष्पाला आपल्या उघड्या छातीवर मानाचें स्थान देऊन निर्भय केलें ! भीतींतून मुक्त केलें ! जन्म सार्थकीं लावला– अशी त्या फुलाची खातरजमा केली. त्याला विश्वास आला. भाऊसाहेबांना आपलें जीवन धन्य झालें, असें खरोखरच वाटलें ! व्यक्तीची 'आवड' पुरली !

— गुलाब फुलांचा राजा खरा. पण नागचाफाही फुलांचा सम्राट् आहे, अशीच भाऊसाहेबांची खात्री. गुलाबाला मानाचा मुजरा करावा, आणि नागचाफ्याला सादर कुर्निसात कां करूं नये ? तें जितकें मनोहर, सुगंधी, तितकें तें अत्यंत दुर्मिळही असतें ! अशी सुंदर दुर्मिळ वस्तु आपली झाली, तर स्वतःला कोण धन्य समजणार नाहीं ?

— कवितेंतील काव्यमूर्ति रसिकाला तन्मय करते, बोलायला लावते,– तर तीच जीवत काव्यमूर्ति साक्षात् समोर उभी राहून, आपण होऊन रसिकाशीं लडिवाळपणा करायला लागली, आपले सुकोमल कर गळ्यांत घालूं लागली, तर कोणता रसिक तिच्या सहवासानें वेडा होणार नाहीं ?

—भाऊसाहेब सुमंत नागचाफ्याच्या फुलाच्या प्राप्तीनें म्हणा, किंवा त्यांना जिवंत काव्यच रंगवायला लाभलें म्हणून समजा, ते वेडे झाले. नाचूं लागले. आनंदसाम्राज्याचा सुवर्णकलश आपल्या हातीं आला; आपणासारखे आपणच सुखी, असें त्याना वाटलें! आणि म्हणूनच ते निःसंकोच मनानें, खुल्या दिलानें नागचाफ्याचें फूल आपल्या छातीवर लटकवून घरीं आले! आपल्याप्रमाणेंच घरीं सर्वांनाच ते फूल पाहून आनंद वाटेल ही त्यांना खात्री होती! पण —

पण भाऊसाहेबांना निराळा अनुभव तात्काळच अनुभवण्याची पाळी आली. त्यांच्या छातीवर असलेल्या नागचाफ्याच्या फुलाकडे पाहून त्याच्या आईनें डोळे वटारले, पत्नीनें नाक मुरडून तोंड बाजूला वळविलें. जिवलग मित्रांनीं, सासूनें, सासऱ्यानें दीर्घ सुस्कारे सोडायला सुरवात केली. शेजारी-पाजारी, ओळखीचे–पाळखीचे, केव्हा तोंडावर, केव्हां बाजूस, पण भाऊसाहेबांना ऐकायला जाईल इतक्या मोठ्यानें आपसात कांहींना कांहीं कुजबूज करूं लागले.

" भाऊसाहेबानं हें काय मांडलं आहे? या बापड्याचं होणार तरी कसं जगांत यापुढे? " आईचें पुटपुटणें.

" माझ्या जन्माचा– सुखाचा– आनंदाचा सत्यानाश झाला. मीं असं कोणतं पाप मागल्या जन्मीं केलं होतं? माझ्या हातून काय चुकलं होतं? मी रूपानं काय वाईट आहें? का वयानं झाल्यें? का इकडच्या मर्जीविरुद्ध वागलें? म्हणून माझ्यावर ही वेळ स्वारीनं आणावी?" भाऊसाहेबाच्या पत्नीची ही अशी घुसफूस!

" आपल्या लाडक्या लेकीला भाऊसाहेबांच्या पदरीं आपण घातली त्यापेक्षां आपल्या हातांनीं तिला एकाद्या विहिरींत लोटली असती तर फार बरं झालं असतं. आतां तिच्या मुलाबाळांची व्यवस्था आपल्याला कशी लावतां येईल? ही एक हृदयाला जाळणारी चिंता, हा हृद्रोग, आपल्या मागें लागला." भाऊसाहेबांच्या शहाण्या सासऱ्याचे उद्गार भाऊसाहेबाच्या कानांत घुमूं लागले.

" भाऊसाहेब ! बोलूं नका आमच्याशीं ! आपण असली काहीं अतिशहाणपणाची करणी केली आहे कीं त्यामुळें आमच्याशीं बोलण्याशी तुमची लायकी राहिलेली नाहीं ! आपल्या कृतीनें आपल्या आईनं हाय खाल्ली ! आमच्या ' वहिनीं 'च्या सुंदर संसाराचा उन्हाळा केलात. ती बिचारी झुरणीस लागली !– तुमचीं सोन्यासारखीं मुलं दीनवाणीं दिसायला लागलीं. या कशाकडे तुम्हीं लक्ष दिलं काय ? देऊं शकतां काय ? कां आम्हीं तुमच्याशीं स्नेह ठेवावा ? कां बोलण्याचा मान तुम्हांला द्यावा ?" भाऊसाहेबांचे जिवलग मित्र– ज्यांना भाऊसाहेबानें माधुकऱ्ये असून मित्र म्हटलें, शिकवून शहाणे केलें, संपत्ती देऊन सधन बनविलें, आणि मान देऊन स्वतःइतकें सन्मानिलें, ते मित्र भाऊसाहेबांचा त्यांच्या तोंडावर प्रतिपावली पाणउतारा करूं लागले.

व्यवहारच पाहणाऱ्या आप्तेष्टमित्रांची अशा रीतीनें भाऊसाहेबांविरुद्ध सयुक्तिक–अयुक्तिक बडबड सुरू झाली.

त्यानंतर गांवमामाप्रमाणें म्हणा, कीं आखाडसासऱ्यासारखा म्हणा, हा आगंतुकपणें आपण होऊन सार्वजनिक काकांचा पेशा पत्करणाऱ्या कोटींतला समाज – आणि त्याची निवड– व्यक्त होऊ लागली, भाऊसाहेबांच्या नव्या आवडमूर्तिसंबंधानें !

कांहीं द्यावयाचें नाहीं, गरजेला केव्हां उभे राहावयाचें नाहीं. कधीं झीज सोसायची नाहीं, किंवा स्वतःच्या खिशाला चाट लावून घ्यायची नाहीं; पण उपदेशाच्या मोफत बाटल्या, उठल्या सुटल्या पाजावयाची मात्र नेहमीं तयारी, असा समाज भाऊसाहेबांबद्दल नाक चढवून आणि भिंवया वांकड्या करून बरळायला लागला.– भाऊसाहेबांवर वेंचक मुक्ताफळें उधळायला सरसावला.

––" भाऊसाहेबांनीं संसार सोडला ! माणूस माणुसकींतून उठला ! घर बुडविणार ! बायको–मुलांना भिकेला लावणार ! स्वतःला शेवटीं मातीमोल करून घेणार !..." वगैरे वगैरे.

— आपल्या आवडीशीं आप्तेष्ट नी समाज सहमत नाहीं, हें भाऊसाहेबांनीं ओळखलें; अजमावलें. पण ' असें कां व्हावें ? सर्वांचा समन्वय

कां होऊं नये ? अलगुजाच्या तीन बारीकशा भोंकातून संवादी सूर निघूं का नयेत ? ' हा भाऊसाहेबांना प्रश्न पडला.

गाणाऱ्याला खात्री कीं आपण तालाला पक्के आहोंत,– बेसूर तान तर आपल्या गळयातून स्वप्नांतसुद्धा गायला बसलों तर निघावयाची नाहीं; आपल्याला गाण्याची स्फूर्ति आली आहे; आपण रंगात येऊन गातों आहोंत; पण आपले बजवय्ये– साथीदारांना आपल्या गाण्याची चांगली साथ कां करतां येऊं नये ? त्यांनीं संगनमताची साथ कां करूं नये ? असें बिचकावे का ? थबकावे का ?

भाऊसाहेबांना असाच बिकट प्रश्न पडला.

आणि भाऊसाहेबांच्या, केवळ कांटेखोरपणानें व्यवहार आपणच जाणतों असा टेंभा मिरविणाऱ्या, व्यवहारी आप्तेष्टांच्यापुढें भाऊसाहेबांच्याबद्दलही प्रश्न पडलाच ! प्रश्न त्यानाही बिकट होताच ! पण तसा त्यांना वाटत नव्हता ! व्यवहारी पध्दतीनें नी रीतीनें आपण तो सोडविला पाहिजे– सोडवूं– असा त्याना त्याचा ' आतला आवाज ' सांगत होता. मात्र तो ' आवाज ' भाऊसाहेबाना ऐकूं द्यावयाचा नाहीं, अशी व्यवहारी दक्षता ठेवण्यांत मुत्सद्दीपणा आहे, असें ते मानीत, व तो मुत्सद्दीपणा धारवाडी कांट्याप्रमाणें राखीत.

भाऊसाहेब समोर असले म्हणजे सुस्कारे, उसासे, हुंदके, हताशता, विमनस्कपणा,– दुबळया तिरस्काराचें प्रदर्शन–थोडक्यांत म्हणजे ' करुणरसा ' चा पुरेपूर परिपोष आप्तेष्टाकडून व्हावयाचा, नी त्यांची पाठ वळली कीं " या परिस्थितीला कोणत्या रीतीनें तोंड द्यावयाचें ? " यावर खलबतखाने सुरू !

आप्तेष्टांनीं अगदीं हातालगतचीच एक गोष्ट भाऊसाहेबांबद्दल गृहीत धरून ठेवली. पक्की केली. ती ही कीं, ' भाऊसाहेब आपलें ऐकणार नाहींत. स्वतःचें सोडणार नाहींत ! त्यांना सांगण्याची, सुचविण्याची सोय नाहीं ! ' (' गरज ' आहे आणि त्याप्रमाणें करून तरी पाहिलें पाहिजे, असें वाटावयाला हवें होतें खरोखर ! पण तसें कोणाच्या मनातच आलें नाही. काय कारण आहे ! ) त्यांना आपल्याला सांगता येणार नाहीं. ( हें मात्र अगदीं सत्य होतें ! ) आपल्या सत्तेच्या गुलाबाच्या बागेची भाऊसाहेब नासधूस

करणार! बाग सुकून जाणार. त्या बागेच्या मशागतीवर होणारा खर्च यापुढें भाऊसाहेब आपल्या अधिकारात आणि आपल्या आवडीकरितां "नागचाफ्याच्या" पायीं होऊं देणार! घरच्यांना उपाशीं ठेवून दारच्याना तूपपोळी चारणार.'

ही स्वतःची समजूत ठाम करूनच मग आतेष्टांनीं आपल्या मुत्सद्दी विचारांचे खलबतखाने उघडले होते.

आपल्या परिवाराला पहिल्याप्रमाणें आनंदी, खेळकर कसें बनवावें? हें दिवसेंदिवस भाऊसाहेबांना कळेना. त्यांनीं प्रयत्न कांहीं केला नाहीं हें खरें; पण त्यांच्या मनांत मात्र येई तसें!

त्यांच्या परिवारानें 'भाऊसाहेब आपल्या हातून निसटलेच. ते पुन्हां हातीं तर लागणार नाहींतच; उलट आपल्यासंगतीं घरातल्या उमाप संपत्तीची अलोट लूट करणार!' हेंच उराशीं बाळगून त्या दृष्टीनें नी धोरणानें त्यांच्याकडे पाहाण्याचा नी वागण्याचा पायंडा पाडला.

भाऊसाहेबांच्या 'उदारतेची, प्रामाणिकपणाची, माणुसकीची' हृदय-संदूक अजून उघडीच होती. इतके दिवस सारा परिवार ती पाहातही आला होता. पण आतां ती त्याना दिसेनाशीच झाली, का त्यांच्या लक्षांत ते बहुमोलाचे अलंकार खरे भरलेच नव्हते कोण जाणे? परिवारानें त्यांना आपल्याजवळ बोलावून, आपलेपणानें, जिव्हाळ्यानें, आपुलकीनें विचारलें असतें तर? पण—

पण तें व्हावें कसें?—

लोककल्याणाकरितां थोर पुरुष जगांतल्या चोर, डाकू, दरोडेखोर, बद-माष, अशांनासुद्धां चुचकारून, विश्वासांत घेऊन, गोड बोलून, सहृदयतेनें वागवून, मोकळेपणाच्या सवलती मुद्दाम देऊन त्यांच्यातील दुर्गुण, दोष घालविण्याचा प्रयत्न करीत असतात. त्यांना 'माणसें' बनविण्याचा चंग बांधतात. आणि त्यांच्या त्या सत्प्रयत्नाला गोड फळें येतात, हें कांहीं खोटें नाहीं!

लोककल्याणकारी थोर पुरुष विराट समाजाचें स्वतःच्या प्रयत्नांनीं हित साधतात.

. व्यक्तीचें हित साधणारा थोर पुरुष म्हणजे व्यक्तीचा जिवलग मित्रच नव्हे काय? हा मित्र, त्याला जर वाटलें, प्रामाणिकपणें वाटलें, कीं आपला मित्र चुकला, चळला, घसरला, तर त्यापासून परावृत्त करून त्याला सन्मार्गावर आणण्याकरितां काय करील? काय करतो?

भाऊसाहेब सुमंताचे मित्र म्हणविणाऱ्यानीं काय केलें?

त्यांची आई त्यांच्याशीं कशी वागली?

पितृस्थानीं असणाऱ्या त्यांच्या शहाण्या सासऱ्यानें काय केलें?

त्यांच्या धर्मपत्नीनें त्यांच्याकरितां काय हातपाय हलविले?

'नागचाफ्याच्या फुलाला फेंकून दे. तें फूल तुझा आणि तुझ्याबरोबर सर्वांचाच घात करील!' असे भाऊसाहेबाना सांगितलें असतें तर?

पण मित्रांची तशी छातीच झाली नाहीं सांगण्याची!

प्रथम रागानें आईनें त्यांच्यावर डोळे वटारले.– नंतर मायेच्या कळवळ्यानें अश्रुपातही केला!

सासरा व्यवहारज्ञ. तो मित्र नव्हे कीं लोककल्याणकारी थोर पुरुषही नव्हे. शिवाय 'मुलगी द्यावी आणि तिच्या सौभाग्यसुखासाठीं जावयाचें सुख नी आयुष्य चिंतावें.' ही साधी माणुसकी तरी त्याला आठवली काय? छेः!

धर्मपत्नी बोलून चालून एक अबला! ती काय बोलणार? काय करणार? नी तिला विचारणार तरी कोण? पण ती प्रसंगीं आशेच्या नजरेनें सासूकडे आणि केविलवाण्या दृष्टीनें आपल्या बाळांकडे वारंवार पाही. मूकरुदन करी.

इकडे भाऊसाहेब मस्तपणें नागचांफ्याच्या फुलाच्या नादात गुंग आहेत, आनंदाची लयलूट करीत आहेत, तोंपर्यंत, त्यांच्या मित्रांच्या, सासऱ्याच्या आणि भाऊसाहेबांच्या 'कुटुंबा'च्या हितचिंतक नातेवाइकांच्या खलबतखान्यांत, खलबतें परिणत झालीं. पक्क झालीं. अंमलबजावणी करण्याच्या मोलाचीं झालीं.

अम्मलबजावणी करायला लहानमोठा मोका हवा होता. कारण हवें होतें. त्यावर सर्वांची बारीक नजर होती!

शूराला निःशस्त्र केलें म्हणजे तो हतबल होतो, शरण येतो; नागाचे दांत पाडले म्हणजे त्याच्यापासून कोणालाच भय उरत नाहीं. अधिकाऱ्याला बडतर्फ केलें म्हणजे त्याचा ताठरपणा कोणाला तापदायक होत नाही. या चालीवर भाऊसाहेबांविरुद्ध चालविलेल्या त्यांच्या नातेवाइकांच्या खलबतखान्यात नक्की झालें कीं,...

धनदौलत, स्थावर–जंगम याचे धनी भाऊसाहेब आहेत. पैसा हाच एक त्यांच्या स्वैर वागण्याच्या आणि आपल्या इच्छातृप्तीच्या मार्गांत प्रबल आहे! पैसा! पैसा!! पैसा!!! परमेश्वरालाही शरण आणणारी काय ही शक्ति पैशाच्या ठिकाणीं आहे!

' हा पैसा 'च त्यांच्या हातून युक्तियुक्तीनें काढून घेतला, त्यावरील त्यांचा कायदेशीर हक्कच काढून घेतला तर? भाऊसाहेबांचे डोळे खाडकन उघडतील! ते निर्विष होतील! त्यांचा ताठरपणा उरणार नाहीं. ते शरण येतील. ज्या रहदारीच्या रस्त्यावर बेवारशी नागचाफ्याचें फूल त्याना सापडलें, त्या रस्त्यावर, ज्या फुलासाठींच आपल्या अफाट संपत्तीला मुकण्याची पाळी आपल्यावर आली, त्या फुलालाच भिरकावून देतील ते. व्यवहारी आणि पोक्त विचार ठरला खलबतखान्यांत, तो हाच.

विचार ठरला! नक्की झाला! व्यवहारी तज्ज्ञांना हायसें वाटलें!

मागल्या महायुद्धांत ' देमाय-धरणी ठाय ' असें दोस्त राष्ट्रांना करायला लावणारा जर्मन बादशहा कैसर— आपण युक्तीयुक्तीनें जिंकतों केव्हा, त्याला नामोहरम करतों कधीं, आणि त्याला दातीं तृण धरून आपण म्हणू त्या तहनाम्यावर सही करायला भाग पाडतों कसे? ही तीव्र विवंचना, त्यावेळीं जितकी समर्थ दोस्त राष्ट्रांना लागली नसेल, त्यापेक्षा तीव्रतर तळमळ भाऊसाहेब सुमंताच्या आप्तेष्टांना लागून राहिली! त्या महायुद्धांत व्हर्सायच्या तहाचा दोस्तांना अनुकूल आणि जर्मनाना प्रतिकूल, पहिल्याला सुदिनासारखा आणि दुसऱ्याला दुर्दिनासारखा उजाडलाच कीं नाहीं?

तोच, तसाच प्रकार, तोच सुदिन, तसाच दुर्दिन, भाऊसाहेबांचे आप्तेष्ट आणि भाऊसाहेब याच्यासाठीं आला एकदांचा!

'आतेष्टांना एक क्षुल्लक कारण निमित्ताला सांपडलें! तेवढेंच त्याना पुरेसें झालें!

महायुद्ध पुकारावयाचेंच असें एकदां ठरल्यावर तें पुकारायला मोठेंच कारण घडावें लागतें असें कुठें आहे? छोटेंसें पुरतेंच की! तोच प्रकार हा.

ज्याच्या हातीं जामदारखान्याच्या किल्ल्या, जो पोक्त, माहितगार आणि विश्वासू,—— भाऊसाहेबाच्या त्या दिवाणजीला गोटांत घेऊन, भेद पाडून, 'दिवाणा' बनविण्यांत आलें, आणि त्याच्या मुखानें एक दिवस रामाच्या पाऱ्यांत, भाऊसाहेब मस्त आनंदात असता, त्यांना कसलाही सुगावा न लागूं देता, त्याच्यावर आतेष्टांनीं खलबतखान्यांत अखेरचा निर्णय घेतला होता, त्याला अनुसरून संगीन रोंखली!

'श्रीमंत, सरकार, मायबाप! भाऊसाहेब!—' सारें शरीर कांपत आहे, हातपाय लटपटत आहेत, हात जोडले आहेत, घशाला कोरड पडली आहे, ओंठ सुकले आहेत ते ओले करण्यासाठी जीभ वरचेवर त्यांवरून फिरवीत आहेत, अशा थाटांत भाऊसाहेबांचे दिवाणजी त्याच्यापुढे बोलते झाले, 'आपलें कारभाराकडे लक्ष नाहीं. व्यवस्था होत नाहीं नुकसान फार होत असतें. त्याकरितां जर इस्टेटीची— संपत्तीची व्यवस्था दुसऱ्या हातीं निरविता आली— तर तरणोपाय दिसतो.— आपण बाजूला व्हाल— वाईट वाटतं आम्हांला,— आपण दयाळू, मायाळू, आपलं कृपाछत्र आम्हाला सुखाचं झालं. आतां पुढें कोण नेमाल,—— कोणाला दवलत संभाळावयाला लावाल,— ते कसे असतील, आम्हांला कसे वागवतील — कल्पना करवत नाहीं,—वाईट वाटतं, दुःख होतं. पण प्रश्न आमचा नाहीं. प्रश्न आपल्या सुखाचा, आपल्या धनदौलतीचा सुरक्षिततेच्या, आपल्या मुलाबाळांच्या भावी सुखाचा आहे.—— तेव्हां म्हणतों,— म्हणजे त्याचं असं—' दिवाणजींचे शब्द साधे, सुबोध, आदराचे होते. पण— पण त्या शब्दांचा अंतिम अर्थ मात्र फार, फार, फारच भयंकर होता! भाऊसाहेबांना तो अर्थ समजला आणि उमगलाही! त्याची सुप्तावस्था खाडकन् संपली!

आपली आवड समाजाला पटली नाहीं, आप्तेष्टांना रुचली नाहीं, सोसली नाहीं ! दिवाणजी बोलले; पण त्यांचे ‘बोलविते धनी’ निराळे आहेत, हें न समजण्याइतके भाऊसाहेब अज्ञ खचित नव्हते !

आपल्या माणसाना असें कां वाटलें? त्यांनीं ही वेळ कां आगली ? त्यांना आपल्याबद्दल जें वाटलें, तसेंच आपण आहोंत का? त्यांनीं आपल्याला ओळखलें नाहीं, कीं आपणच आपल्याला खरोखरी पारखलें नाहीं?

भाऊसाहेबांनीं डोळे मिटून अंतरंगांत पाहिलें. त्यांची हृदय–संदूक निदान त्याक्षणीं तरी बंद असलेलीच त्याना दिसली ! त्याना आपण कसे आहोंत हेंच समजेना !

आपल्या माणसाना मीं ओळखलों नाहीं ? त्यांना माझ्यापेक्षां, माझ्या हृदयापेक्षा, माझ्या आनंदापेक्षा, माझ्या व्यक्तित्वापेक्षां, पैसा श्रेष्ठ वाटला ! तोच सर्वस्व दिसला ! माझ्यापेक्षां पैशांची काळजी आणि चिंता त्यांना अधिक वाटली ?

भाऊसाहेबांनीं आईकडे पाहिलें. ती माउली अश्रू गाळीत होती !

भाऊसाहेब पत्नीला भेटले ! ती बोलती बंदच झालेली त्यांना आढळली !

त्याच्या अजाण बाळाना काय? हेंही नाहीं नी तेंही नाहीं ! भाऊसाहेब दृष्टीआड असले,— घरीं अंगणांत खेळायचे. समोर आले, त्यांच्या अंगाखांद्यावर उड्या मारून धूम माजवायची ! एवढेंच त्यांचें जग ! हाच त्यांचा आनंद !

मस्तकांत ज्वालामुखी भडकला ! पण भाऊसाहेबांचा स्वभावधर्मच असा ! त्यांच्या तोंडावर अंतरंगातील खळबळीचा लवलेश दिसेल तर शपथ !

व्यक्तीकरितां कुटुंब, कुटुंबाकरितां समाज, समाजाकरितां देश, नी देशाकरिता राष्ट्र ! कोण कोणाकरिता आहे नी कोण कोणाकरितां नाहीं? कोण कोणाला कोणत्या करणीनें तारतो, नी कोणत्या कृत्यानें मारतो? भाऊसाहेबांची ठाम समजूत, कीं आपण आपली आवड पुरविली त्यांत कुटुंबाचें, समाजाचें, देशाचें वा राष्ट्राचें कसलेंच नुकसान केलें नाहीं. करणार नव्हतों ! मग आपल्यावर अशी संगीन कां रोखली जावी? रस्त्यावर पडलेल्या सुंदर, नाजुक, अश्राप, निष्पाप, निराधार, अशा नागचांफ्याच्या फुलाला जवळ

केलें, हा काय अपराध होतो? आतेष्टाच्या हट्टाकरितां मीं हें फूल पुन्हा निर्दयपणानें फेंकलें तर काय होईल? एका जीवाचा घात, समाजाचा अन्याय, देशाची चूक आणि राष्ट्राचा अपराध करीन, असें नाहीं का होणार? हें मला कळतें.— माझ्या आप्तेष्टाना का समजूं नये? पण त्यांना माझ्यापेक्षां पैशांचेंच जर जास्त महत्त्व वाटतें, तर त्यांना जास्त काय दिसणार?

भाऊसाहेबांनीं स्वतःच्या बुद्धीला न्यायाधीश बनविलें, आणि न्याय मागितला. बुद्धीचा कौल घेतला आणि लगेच निर्णय जाहीर केला! आपल्या दिवाणजींना त्यानीं नेहमींच्या पद्धतीनें अगदीं हंसत नि सहजासहजीं सांगितलें,

" दिवाणजी, तुमचें म्हणणें बरोबर आहे! तुम्हांला जसें वाटतें तसेंच होऊं द्या. तुम्हीच वकील बोलवा तुमच्या माहितीचे,— आपल्या लोकाना आणा,— आणि जसें काय तुम्हांला ठरवावयाचें तसें ठरवून करून टाका! आजपर्यंत तुम्हीं समोर आणलेल्या कागदावर न वाचतां सही करीत आलों तसाच आतांही वागेन. समजला? जा. "

भाऊसाहेबांचा निर्णय ऐकून भाबड्या दिवाणजींचा जीव पत्रावळी-एवढा झाला. त्यांनीं समाधान, आनंद व्यक्त केला!

सासरा आला. मेहुणा उपस्थित झाला. डॉक्टर आले. वकील आले. मित्रमंडळी जमली! कायदेशीर भाषेंत कागद लिहिला गेला. भाऊ-साहेबांना वाचून दाखविण्यांत आला.

भाऊसाहेबांनीं त्या कागदावर सही करण्याकरतां तो हातांत घेतला. ते गंभीर नव्हते, खिन्न नव्हते, उदास नव्हते, संतापले नव्हते. खेळकर सागरलाटा वायुलहरींशीं सहजलीलया खेळत वागडत असतात, हंसत असतात, तशीच कागदावर सही करतांना भाउसाहेबांची मुद्रा होती!

व्हर्सायच्या तहनाम्यावर, जर्मन सेनापती— पराभूत झालेला सेनापती सही करीत असतांना त्याच्याकडे विजयानें धुंद झालेलीं दोस्त राष्ट्रें ज्या दिमाखानें आणि आनंदानें पाहात असतील, त्याच दृष्टीनें जिंकलेल्या कागदावर सही करणाऱ्या भाऊसाहेबांकडे आप्त पहात नसतीलच असें कोणीं म्हणावें?

आणि भाऊसाहेबांच्या मनांत सहीचीं अक्षरें लिहितांना काय येत असेल ? आपल्यामुळें, आपली सलणारी संपत्ति– सलणारें सौंदर्यसौख्य आपण त्यांच्या समाधानाकरिता या लेखानें त्याच्या स्वाधीन राजीखुशीनें करीत आहेत ! आणि त्याच्या मोबदल्यात ?

त्याच्या मानसदृष्टीपुढें त्यानीं हस्तगत केलेलें, त्याचें झालेलें, नागचाफ्याचें फूल– प्रफुल्ल– हंसरें फूल नाचत होतें !

---

# नीला : ३

" पण ही नीला कोण ? "

" मला काय माहीत ? "

" विद्यार्थिनी ? "

" शक्य नाहीं !–"

" कुणी कुमारी ? "

" देव जाणे ! "

" का एखादी चवचाल गतभर्तृका ? "

" तें तरी कुणीं सांगावं ?–"

" नाहीं तर कुणा नावडत्या नवऱ्याची चांडाळीण ?–"

" शांतं पापं ! शांतं पापम् !– उषा, काय ही तुझ्या कल्पनेची भरधांव धांव ग ? " असें म्हणत म्हणत आणि यापुढें उषेच्या मनाचें तारूं भलतीकडेच भडकेल कदाचित्, संताप्रातिरेकाच्या तुफान सागरांत तें उलथेंपालथें

होईल, या भीतीनें भास्करराव भोंडे यांनीं आपल्या उषेच्या, प्रेमळ पत्नीच्या हातांतून ती वाचीत असलेलें पत्र जवळ जवळ काढून- हिसकावून घेतलें म्हणा ना! हातांतून पत्र गेलें तरी उषा अजून वाचलेल्या त्या पत्रांतील मजकुरासंबंधीं, त्या पत्राच्या खालीं असलेल्या "आपली प्रेमाकांक्षी नीला" अशा रीतीनें लिहिलेल्या सहीचाच विचार करीत होती.

उषेच्या हातीं पत्र देतांना, तें ती वाचताना भास्करराव भोंडे तिच्याकडे कौतुकानें, प्रेमानें पाहात होते. हंसत होते! पत्रांतील मजकुरावरून उषेचे डोळे जात असतां तिच्या सुंदर मुखकमलावर कसल्या विकारलहरी उसळ-तात हें न्याहाळण्याची त्यांना मुळींच गरज वाटत नव्हती. निःशंक मनानें भास्कररावानीं आपल्याला आलेल्या कोणा "नीला" नावाच्या अज्ञात तरुणीचें पत्र अगदीं हंसत हंसत आपल्या प्रेमळ पत्नीला मुद्दाम वाचावयास दिलें होतें. उषा पत्र वाचील, आपल्याप्रमाणेंच ती तें वाचून हंसेल आणि तें सुवाच्य, सुंदर, वळणदार अक्षरानीं लिहिलेलें पत्र भिरकावून देईल अशी भास्कररावांना बालंबाल खात्री होती.

पण स्त्रीजात म्हणजे साक्षात् मत्सराचा अवतार! स्त्रियांचा मत्सराग्नि केव्हा, कसा, का चेतेल आणि स्वतःचा संताप आणि पतीला 'दे माय धरणी ठाय!" करावयाला लावील हें कोण सांगणार?

"नीला"चें भास्कररावांना आलेलें- त्यांनीं होऊन दाखविलेलें- प्रेमपत्र वाचतांना नाहीं, पण वाचून झाल्यावर तिच्या हातून भास्कररावांनीं तें काढून घेतल्यावर, उषेनें भास्कररावाकडे एक ओझरता दृष्टिक्षेप टाकला. त्यात भास्कररावांच्याचबद्दल शंका प्रकट झाली नसेलच असें कसें सांगावें? निःशंक भास्कररावांच्या ध्यानात उषेच्या त्या दृष्टिक्षेपाचा भाव आला नसेल- पण तरी सुद्धां उषेनें भडकूं नये म्हणून त्यांनीं तिच्या हातून तें पत्र काढून घेतलेंच;— साप चावला, पण चावणाराला बेडूक दिसला तर सापाचें विष बाधत नाहीं; बेडूक चावला आणि सापानें दर्शन दिलें, तर आपल्याला खात्रीनें सर्पदंश झाला, अशी समजूत होऊन विष चढतें, बाधतें, प्राण कासावीस करतें- असें म्हणतात.

अज्ञात 'नीला'चें पतीला आलेलें प्रेमपत्र वाचून उषेची गत तीच झाली ! तिनें नीलाच्या सहीचें पत्र पाहिलें. "नीला"ला प्रत्यक्ष पाहिले नाहीं तरी तिला क्षणमात्र कसेंसेंच झाल्याशिवाय राहिलें नाहीं ! "उषा, विचार कसला करतेस ?" पत्राचा आणि पत्रलेखिकेचा अधिक विचार तिनें करूं नये म्हणून भास्करराव तिला म्हणाले.

"त्या नीला नागिणीचा !" उषेनें हंसरा चेहरा करून म्हटलें.

"जाऊं दे ! नागिणीचा इतका कसला विचार करायचा ?– ती आपल्याला माहित नाहीं; दिसली नाहीं; कधींकाळीं दिसलीच– आपल्या-पर्यंत पोंचलीच तर—"

"तर काय ? साहित्यिक मामाशाही विवाह करणार, कीं डायरेक्टरी विवाह करणार तिच्याबरोबर ?" उषेनें खवचटपणानें विचारलें.

"नागिणीला ठेंचायचं असतं; तिला आपल्या गळयांत त्रिपारी विळखा घालूं द्यायचा नसतो." भास्करराव हंसतच उत्तरले.

एकाच उत्तरानें भास्कररावांनीं उषेला निःशंक केलें; तिच्यावरील आपल्या अथाग प्रेमाची जाणीव आणून दिली. तिला क्षणमात्र शरमल्यासारखें झालें. तिनें त्यांच्याकडे सानंद प्रेमानें पाहिलें. त्यांचा आनंद गगनांत मावेना. तरी पण दोघानाही 'नीला' कोण ? या प्रश्नाचें गूढ होतें तें मात्र तसेंच अनिर्णित राहिलें.

"खरंच आपल्या प्रेमात अकारण विष ओतणारी ही नीला कोण ? तिचा शोध मला लावायला नको का ?" निःशब्द भाषेनें तो एकच प्रश्न दोघांनीं दोघांना नुसत्या पाहाण्यानेंच केला.

* * *

श्रीयुत भास्करराव भोंडे बोलून चालून एक शाळामास्तर. आपलें काम भलें कीं आपण भले ! शाळेंत असतांना विद्यार्थि आणि आपण; घरीं असलें कीं आपण आणि उषा. यापलीकडे दुसरें जग त्याना माहितही नसे आणि त्यांनीं तें माहित व्हावें अशी कधीं धडपडही केली नाहीं. घरीं उषेचे लाडके, शाळेंत विद्यार्थ्यांचे आवडते. कांहीं आंत नाहीं आणि कांहीं बाहेर नाहीं. विद्यार्थ्यांना भास्करराव जीव कीं प्राण वाटत. विद्यार्थीही त्यांच्यावर बहाल

खूप असत– विद्यार्थिनीदेखील. किती विद्यार्थी आणि विद्यार्थिनी भास्कर-रावांच्या घरी येत. नुसता धुमाकूळ घालीत. शिकवण्याचा वेळ संपला कीं, भास्करराव विद्यार्थी–विद्यार्थिनींचे बरोबरीचे मित्र–सवंगडीच होत. त्यांच्याशी खेळण्यांत, थट्टामस्करी करण्यात कधीं कमी करायचे नाहींत.

घरीं येणाऱ्या विद्यार्थी–विद्यार्थिनींना उषा देखील भारी मायेनें वागवी. चहा–फराळाचें द्यायला ती चुकायची नाहीं. त्यांत कधीं तिनें आळस केला, चालढकल केली तर विद्यार्थी–विद्यार्थिनी उषेला अगदीं भंडावून सोडीत. " आम्हाला खायला हवं ! खायला दिल्याशिवाय आम्ही नाहीं सोडणार तुम्हांला ! " असें म्हणत उषाचें भाडून भुस्कट पाडीत ! खायला घेतल्या-शिवाय ती वानरसेना उषेला मुळींच सोडीत नसे ! इतकेंच काय, पण भास्करराव आणि उषा बाहेर बोलत बसल्याचें पाहून काहीं अवखळ विद्यार्थी खुशाल स्वयंपाकघरांत गुपचूप शिरून फडताळें उघडून उषानें खायला करून ठेवलेल्यावर झडप घालून लाबवीत, फन्ना पाडीत; आणि पुन्हां साळसूदपणानें उषेसमोर येऊन, " आम्हांला आज खायला द्यायचा विचार नाहीं वाटतं ? दिल्याशिवाय सोडणार नाहीं तुम्हाला–चला ना ! " म्हणून त्याची पाठ पुरवीत. मायाळू मातेच्या खोट्या रागाप्रमाणें रागाचा आव आणीत, कुरकुरत उषा उठे, आंत जाई, विद्यार्थ्यांना कांहीं खायला द्यावें–बहुतेक त्यांच्याचकरिता ती नेहमीं आवर्जून पुष्कळ कांहीं तरी खायचें करून ठेवीच–– म्हणून फडताळ उघडी–– डबा उघडून पाही. त्यात कांहीं नाहीं असें पाहिलें म्हणजे सारा प्रकार तिच्या लक्षांत येई. " अरेच्या, घेतलंत वाटतं सारं ? अन् मला फसवतां काय ? " म्हणून त्यांच्यावर चवताळे. विद्यार्थी भिण्याऐवजीं खोखो करून तिच्यासमोर खिदळत. उषा भास्कररावा-पर्यंत विद्यार्थ्यांच्या विरुद्ध फिर्याद नेई. ते हंसून " जाऊं दे ग, त्यांच्याच-करतां केलं होतंस ना ? घेतलं त्यांनीं, त्याकरतां इतकी रागावतेस कां ? " असा निवाडा करून विद्यार्थ्यांचीच कड घेत.

भास्करराव भोंडे यांच्याबद्दल थोडक्यांत सांगावयाचें झालें तर, ते शाळेंत भाडोत्री शिक्षकांच्या जातीचे शिक्षक नव्हे. तसे आपल्या घरांत वावरणारे

भंपक गृहस्थांच्या वर्गातील पण नव्हते. नमुनेदार गुरु आणि आदर्श पति. कित्ता पुढें ठेवावा असे सद्‌गृहस्थ हेंच त्याचें वर्णन सार्थ व समुचित होईल भास्कररावांचे शाळाधिकारी त्याच्याबद्दल "भोंडे आपल्या विद्यार्थ्यांना जास्त सवलती देतात, लाडावतात, सैल सोडतात, शिस्त राखीत नाहींत, कडकपणानें वागवीत नाहींत, विद्यार्थी बिघडतील, एखादे दिवशीं त्याचे विद्यार्थी, त्यांच्याच नव्हे, पण सर्वांच्याच डोक्यावर बसतील." अशी बारिकमोठ्या आवाजांत कुरकुर करीत.

— पण विद्यार्थी–विद्यार्थिनी आणि भास्कररावाना जाणणारे पालक त्याच्या चोख वर्तनाबद्दल, उत्कृष्ट शिक्षणाबद्दल त्याना चागलेच चाहत असत. विद्यार्थी–विद्यार्थिनींची आपल्या गुरुजींचा उपमर्द करण्याची कधींच छाती होत नसे. नवथर किंवा बावळट अशा किती शिक्षकाची विद्यार्थी नेहमींच टिंगल-टवाळी करून सारा वर्ग डोक्यावर घेऊन त्रेधातिरपीट काय कमी करतात ? शिक्षकाला 'दे माय धरणी ठाय' करायला कधीं सोडतात ? हुर्यो करून, नकला करून, 'नको ही नोकरी' असें म्हणावयाला लावून काय कमी उच्छाद मांडतात ?

पण आश्चर्याची गोष्ट कीं, भास्करराव भोंडे याना विद्यार्थ्यांचा तसा कटु अनुभव ते नोकरींत शिरल्यापासून चालू क्षणापर्यंत बहुतेक कधीं मिळाला नव्हता.

'बहुतेक' म्हणायचें कारण इतकेंच कीं, विद्यार्थी आपल्यावर येणाऱ्या, आपल्या कोणाही व कसल्याहि शिक्षकाला तसा कधीं सोडीत नाहींतच ! शिक्षकाची प्रथम थोडीशी तरी परीक्षा, जरा तरी चांचणी घेतल्याशिवाय आपल्यावर मुकाट्यानें अधिराज्य करूं देणें कधीं तरी कोणत्या विद्यार्थ्याला साधलें आहे का कोठें ?

तशी भास्करराव भोंडे यांची परीक्षा घेण्याचा वक्त त्याच्या विद्यार्थ्यांनी त्यांच्यावर आणला होता. पण धिटाईनें, चातुर्यानें आणि अक्कलहुशारीनें ते त्यांत पसार झाले होते.

ही गोष्ट कोणाला माहीत नव्हती. 'विद्यार्थ्यांना तुम्ही कधीं भीत नाहीं, विद्यार्थी तुमच्या वाटेला तसे कधीं जात नाहींत, हें कसें तुम्हांला साधलें

आहे ?' असें त्यांच्या मर्जीतले—सलगीचे—आवडते विद्यार्थी पुष्कळदां मोठ्या गमतीनें व आश्चर्यानें त्यांना विचारीत. तेव्हां भास्कररावही आपली चुकून माकून विद्यार्थ्यांकडून करण्यांत आलेली फजिती लपवून भलतीच फुशारकी कधीं मारीत नसत. ते स्पष्ट सांगून टाकीत, "अरे, असं कसं होईल ? मी झालों तरी माणूस आहें ! मीहि नवखा होतों. पहिल्या दिवशीं शिक्षक म्हणून वर्गांत शिरलों, तेव्हां अंगोचरपणा करून विद्यार्थ्यांनीं माझी परीक्षा घेतलेली आहे. मीही मनातून घाबरलों होतों—विद्यार्थ्यांवर रागावलों होतों—पण निभावलं माझं. त्याला कारणंही तशींच होतीं. मी विद्यार्थी असताना आमच्यावर येणाऱ्या शिक्षकावर मी स्वतः प्रसंग आणले होते, तें माझ्या ध्यानांत होतं. शिवाय माझी शिकवल्या जाणाऱ्या विषयांची जय्यत तयारी होती. मग मी विद्यार्थ्यांच्या परीक्षेंतून सहीसलामत सुटल्यांशिवाय कसा राहीन ? त्यांचा आवडता न होईन तरच आश्चर्य नव्हे का ? त्यांतूनही कधीं तरी माझा सुमार सुटत असे. विद्यार्थ्यांवर मी खवळत असें. कांहीं प्रसंग तर त्यामुळं माझ्यावर असे येऊन गेले कीं, 'नालायक शिक्षक' म्हणून मला नोकरींतून निघायचा प्रसंग माझ्यावर येतो कीं काय, अशी सकारण भीति वाटत होती. तो प्रसंग टळला. तो चांगल्या रीतीनें टाळतां यायला मला माझी उषा माझी गुरु झाली. मुलींना—विद्यार्थ्यांना कसं मायेनं, प्रेमानं, जिव्हाळ्यानं वागवावं, हें मला उषेनं शिकवलं आहे. मुलांना मायेनं कसं वागवावं हें पुरुषानीं खरोखर बायकांपासूनच शिकलं पाहिजे !"

प्रश्न करणाऱ्याला भास्करराव निःशंकपणानें हें असें सांगत. उषेदेखत सुद्धां आपल्या विद्यार्थ्यांना हें समजावून देत आणि तें त्यांचें खरें नव्हतें का ?

* * *

भास्करराव आणि उषा हें आदर्श प्रेमळ जोडपें आहे, हें तर जग-जाहिरच होतें. पण त्यांची ती ख्याति त्यांच्या विद्यार्थिवर्गांतही होती. त्यांच्या विद्यार्थिनींनीं उषेचा, आणि विद्यार्थ्यांनी भास्कररावांचा आदर्श पुढें ठेवला होता. कित्येक तर धिटाईनें आपले विचार त्यांच्याजवळ बोलून सुद्धां दाखवीत.

भास्करराव इकडे पाहायचे नाहींत कीं, तिकडे बघायचे नाहींत. कित्येक चावट विद्यार्थी आपापसांत केव्हां तरी चर्चा करीत, " आपले सर अगदीच ' हे ' कसे बुवा? किती तरी शिक्षक आधीं शिष्या आणि मग तीच पुढें प्रिया असं करीत नाहींत का! तसं कांहींच कसं हे करीत नाहींत ? "

भास्कररावांच्या विद्यार्थिवृंदांत कांहीं चित्रकार, कांहीं कवि, आणि कांही लेखकही होते. भास्करराव त्या त्या विद्यार्थ्याचा गुण ओळखून, त्यात तो पारंगत व्हावा म्हणून मनापासून उत्तेजन देत. चित्रकार आवडीनें भास्कर-राव-उषाचीं रेखाचित्रें वितारीत ! कवि आदर्शप्रेमी युग्म म्हणून त्याच्या-वर कविता रचीत ! भास्कररावाचा सर्वांत आवडता विद्यार्थी दासो गंगेले. तो लेखक. त्याला गोष्टी, कथा, नाटकें लिहिण्याचा छंद. मोठा हुषार आणि चलाख पोरगा ! एवढे तेवढे लिहिलें, कीं तो भास्कररावांना दाखवी. त्यांनी तें वाचावें, चुका दाखवाव्या, दुरुस्त्या सुचवाव्या, निरीक्षण कसें करावें, काय वाचावें, कसें वाचावें, चर्चा करण्याचा प्रसंग कसा टाळूं नये वगैरे दिलखुलास त्याला सांगावें.

भास्कररावाच्या अंवतीं भोंवतीं तो नेहमीं हिंडे, त्यांचीं बोलणीं चालणी तो ऐके, पाही. त्याचा विनोद, मनमोकळी वागणीं हीं अवलोकन करी. केव्हा केव्हां भास्करराव किंवा उषा दासोला थट्टेनें म्हणत, " काय रे, आमच्या बोलण्याकडे लक्ष देऊन बघतोस? आमच्या हालचाली पाहतोस? आमच्यावर एखादी गोष्ट-कादंबरी रचणार आहेस, का नाटक लिहिणार आहेस ? "

तोही खवचटपणानें विचारी, " लिहू का? आपली आज्ञा असेल तर लिहीन ! पण लिहिण्यासारखा तसा खटकेबाज प्रसंग अजून घडला आहे तरी कुठं ? "

असें म्हणून तो हंसे. तें जोडपेंही हंसे ! पण भास्करराव लगेच त्याला समजावून सांगत, " अरे दासो, जिवंत किंवा मृत व्यक्ति डोळ्यापुढं ठेवून त्या आपल्या लेखनांत चितारणं, ही काही श्रेष्ठ दर्जाची कला ठरत नाहीं. खऱ्या कलेचा अधिकार त्यापेक्षां उच्च भूमीवर चढल्याशिवांय साधत नाहीं ! व्यक्तिनिंदा किंवा व्यक्तिस्तुति, ओळख पटविणारे आपल्या अंवतीभवंतींचे

मुखवटे चितारण्यांत क्षणकालाची सवंग लोकप्रियता मिळेल. पण तसली कलाकृति चिरंतन टिकणारी सर्वांगसुंदर होत नाहीं हें तुला ध्यानांत ठेवलं पाहिजे."

आपल्याकडून होईल तितकें ज्ञानदान वाटेल त्या वेळीं भास्करराव आपल्या शिष्याला देत असत. दासोसारखा त्यांचा सच्छिष्य किती घेई आणि किती राखी, हें मात्र त्याचा तोच जाणे !

भास्कररावांना साभिमान वाटे मात्र कीं, आपला सच्छिष्य भावीकालांत एक नामवंत नाटककार होणार ! ते त्याला कळूं न देतां त्याच्या लेखन-प्रगतीकडे चांगलें लक्ष ठेवीत.

दासोनें एकादी कल्पना शोधली म्हणजे ती सजवावी कशी, तिचा विकास कसा करावा, ती लेखनतंत्राच्या सांच्यांत बसवावी कशी याबद्दल तो भास्कररावाच्या जवळ येऊन बसे आणि त्यांची एकसारखी पाठ पुरवी. पुष्कळ वेळा असें होई कीं भास्कररावाना फुरसद नसे. मन व्यग्र झालेलें असे, कंटाळा आलेला असे, त्यामुळें दासोला हवा तेवढा त्यांचा मोकळा वेळ त्यांना देतां येत नसे. दासोला मोठें वाईट वाटे. आपले गुरुजी आपल्याला सारा वेळ कां मिळूं नयेत ? त्यानीं आपल्या साऱ्या वेळीं सिद्धबुद्धीचा मन-मुराद उपयोग कां करून देऊं नये, अशी त्याला खंत वाटे. पण भास्करराव झाले तरी काय करणार ? शाळेंतील नोकरी संभाळली पाहिजे, घरातील संसार पाहिला पाहिजे, हें होतें ना त्याच्यामागें ! त्याचें आकलन दासोला नेहमींच कसें होणार ?

पण तो तशा संधीची वाट पाहात होता.

सुदैवानें त्याला लवकरच तशी संधी मिळालीही !

* * *

उषेला फारा दिवसानीं माहेरचें बोलावणें आलें होतें. तिला जायची इच्छा झाली. भास्कररावानीं नाखुषीनेंच परवानगी दिली. उषा माहेरीं निघाली. घरापासून स्टेशनपर्यंत भास्कररावाच्या कितीतरी आवडत्या छात्र-गणांचा घोळका आपल्या 'माईना' निरोप द्यायला मागें आला होता !

उषेला आपलें विद्यार्थी-विद्यार्थिनींनीं चालविलेलें कौतुक पाहून कोण धन्यता वाटली ! तिनें त्याबद्दल कितीदां तरी आनंदोद्गार काढले.

भास्करराव बोलले नाहींत; पण त्यांचा मुखचंद्र खूप खुलला होता !

उषेला नेणारी गाडी स्टेशनमधून सुटली. शेंकडों विद्यार्थि-विद्यार्थिनींनीं हातरुमाल हवेंत फडकवून फडकवून आपल्या 'माईना' निरोप दिला.

माहेरीं जायला मिळतें आहे या कल्पनेनें एका डोळ्यांत आनंदाश्रु, तर भास्कररावाचा वियोग होत आहे या प्रत्यक्ष अवस्थेचे दुसऱ्या डोळ्यांत दुःखाश्रु, अशी उषेची खरीखरी अवस्था झाली होती ! गाडी हालली त्या वेळीं 'येतें' असा शब्द न उच्चारतां उषेनें मानेनेंच भास्कररावांना समजावलें ! डोळ्यांतले अश्रू दिसूं नयेत म्हणून तिनें चटकन् मान वळविली ! भास्कररावांची जवळ जवळ तशीच स्थिति झाली होती !

तो अलौकिक प्रेमाचा क्षण— तें सुरम्य दृश्य सगळ्यांनाच आकर्षक वाटत होतें. दासोला मोहक तर वाटत होतेंच; पण त्याला विचार करण्यासारखेंही निःसंशय वाटलें ! 'निर्लोभ, निर्मल, विशुद्ध असें साक्षात् प्रेमाचें प्रतीकच नव्हे काय हें ? दिसतें तसेंच हें अंतर्बाह्य असेल ?' हा विचार त्याला चाटून गेला. त्याच्या सुपीक मस्तकांत एका नवीन विचाराची वीज चमकून गेली !

'उषामाई' माहेरीं गेल्या. भास्करराव छात्रगणांसह घरीं परतले. सर्वांची दैनंदिनी रीतसर सुरू झाली. विद्यार्थि-विद्यार्थिनी पहिले चारआठ दिवस गुरुजींच्या घरीं येत असत ! भास्करराव दोन्ही वेळां खानावळींतून डबा मागवीत. कांहीं विद्यार्थिनी पुढें होऊन पाटपाणी करून भास्कररावांना वाढीत. एकदां दोनदां तर एकदोघींनीं घरींच स्वयंपाक करूनसुद्धां आपल्या गुरुजींना जेवूं घातलें. भास्कररावांना तें आवडलें नाहीं. 'आधीं शिष्या आणि मग प्रिया' अशा रीतीला जे शिक्षक अनुसरतात, त्याच कोटींत समाज आपल्याला निष्कारण ढकलील असें त्यांना वाटलें असेल. त्यांनीं अडथळा केला. विद्यार्थि-विद्यार्थिनींचा पहिला उत्साहही स्वाभाविक ओसरला. त्यांचें भास्कररावाच्या घरीं येणें कमी होऊं लागलें. पुढें अजिबात बंद झालें. आतां फक्त एकटा दासो काय तो दोन्ही वेळां त्यांच्याकडे येत असे, बसत असे,

अनेक विषयांवर चर्चा करीत असे. भास्कररावही त्याच्याशीं खूप बोलत, निदान बोलण्याचा प्रामाणिक प्रयत्न करीत !

माहेरीं गेलेल्या उषेकडे भास्कररावांचें लक्ष ओढ घेत असावें, ही कल्पना दासोला केव्हां केव्हां आल्याशिवाय कशी राहणार ?

* * *

उषेच्या प्रेमळ व सुंदर मूर्तीचें चिंतन करीत, तिच्या घरीं येण्याचा एकेक दिवस मोजीत असता एक दिवस भास्कररावाच्या हातीं पोस्टाच्या शिपायानें एक पाकिट दिलें. लिफाफा फिकट गुलाबी रंगाचा, अक्षर अत्यंत सुंदर, पण अपरिचित ! त्यानीं पत्र फोडलें. कागदही तसाच फिकट गुलाबी. आणि आंतील पत्राच्या ओळी म्हणजे जशा कांहीं मोलवान, तजेलदार मोत्यांच्या माळा ! भास्करराव ओळी-ओळींवरून दृष्टि फिरवीत होते. अक्षर दाणेदार, तर त्यापेक्षां शब्द गोंडस ! शब्दांपेक्षा वाक्य काव्यमय, तर अर्थाबद्दल कांहीं पुसूंच नका !

गुलाबी रंगानें उत्तेजित केलें, अक्षरानें आनंद दिला, शब्दानीं गुदगुल्या केल्या ! काव्यात्मक वाक्यानीं डोलायला लावलें. पण पत्रातील एकंदर मजकुराच्या अर्थानें, आणि विशेषतः शेवटच्या सहीनें भास्कररावाना जबरदस्त विजेचा धक्काच दिला !

तें पत्र कोण अज्ञात ‘नीला’चें होतें, आणि ती नीला भास्कररावांवर अनुरक्त होती ! तिनें पत्रांत त्यांच्या रूपाचें, त्यांच्या अलौकिक लोकप्रियतेचें मनमुक्त गुणगान केलेलें होतें. ‘नीला’ भास्कररावांशीं लग्न करायला अतिशय उत्सुक दिसली ! भास्कररावांचें लग्न झालेलें आहे, अनुरूप अशी त्यांची उषा त्यांना लाभली आहे, तिच्यावर त्यांचें नितांत प्रेम आहे, या सर्व गोष्टी नीला जाणत होती-- तसा त्या पत्रांत स्पष्ट उल्लेखही होता. असें असून नीला भास्कररावावर लोभावली होती, लग्न करायला उतावीळ झाली होती. तिला भास्कररावांची अनुज्ञा हवी होती-- ती त्या अनुज्ञेची चातकासारखी प्रतीक्षा करीत आहे, असें तिच्या पत्रांत होतें. उषा माहेरीं गेली आहे ही संधि साधूनच पत्र पाठविण्यांतला आपला हेतु पत्रलेखिका

नीलानें सुस्पष्ट केला होता. भास्कररावांना आपल्याबद्दल विचार- अनुकूल विचार-करावयाला मुबलक वेळ मिळावा, हाच तो हेतु !

भास्करराव नीलाचें तें पत्र वाचून खालीं ठेवीत असतांच दासो तेथें उपस्थित झाला. " माईंचं पत्र आलं का ? केव्हां येणार आहेत त्या ? " पत्राकडे ओझरतें पाहात दासोनें सहज विचारलें आणि हंसून म्हटलें, " अरे वा ! माई पण चांगल्याच रसिक झाल्या आहेत कीं ! गुलाबी पत्र त्यांनी लिहिलं आहे ? "

भास्कररावांनीं तें पत्र दासोच्या हातीं निःशंकपणानें हंसत दिलें, आणि म्हटलें, " उपेचं पत्र नव्हे. पण वाच. तुला वाचण्यासारखं आहे. कांहीं तरी तुला त्यावरून लिहिण्यासारखं सुचेल. "

" म्हणजे ? " आश्चर्य दर्शवीत दासोनें विचारलें.

" पत्रच वाच ना ! " भास्करराव पुन्हां म्हणाले.

दासोनें पत्र हातीं घेतलें. डोळ्यापुढें धरलें. साग्र वाचलें. वाचून झाल्यावर दासोनें अचंब्यानें आ वासूनच भास्कररावांकडे पाहिलें. " हें काय हें ? प्रेमपत्र आणि आपल्याला ? कुणाचं ?— ही नीला कोण आहे ? "

" तुला लिहायला एक चमत्कारपूर्ण विषय मिळाला कीं नाहीं, बोल. काय लिहितोस ? गोष्ट ? कादंबरी ? नाटक ? का कविता ? " निर्विकार मनानें भास्कररावांनीं म्हटलें.

" हें पत्र वाचून, सर, तुम्हांला काय वाटलं ? " दासोनें पृच्छा केली.

" वाईट वाटलं. " इतकेंच भास्करराव उद्गारले. दासोला तें पटलेलें दिसलें; पण तो आवेशानें म्हणाला, " आजकालच्या मुली तरुणांबरोबर हिंडतात, बोलतात, खेळतात, हॉटेलांत जातात, बीर घेतात, आम्लेट चापतात हें मला माहीत आहे. कदाचित बरोबरीच्या तरुणांना तशीं पत्रं लिहीतही असतील. पण हिची मजल भलतीच दिसते. मला वाटतं 'नीला' या नांवाच्या तरुणी जरा उच्छृंखलच असाव्यात. नीला नागिणीनं एकदां मागं गांधी—आश्रमांत गोंधळ उडवून दिला होता, तें वर्तमानपत्रांतून आलं होतं. आतां ही नीला-नागिणी आपल्या गळ्याला विळखा घालायला उतावीळ झाली आहे. सर, ही नीला कोण असावी अशी कल्पना येते ? "

" त्याचा विचारच कशाला करावा ? " भास्कररावांनीं त्यांचें तोंड बंद करण्याकरितां म्हटलें. तो गप्प बसलाही. नाहींतर तो आणखी म्हणता, " आपण काय रंगभूमीवरचे नटसम्राट्, रजतपटावरील हीरो, ख्यातनाम कवि, का प्रथितयश कादंबरीकार— म्हणून या नीलानं आपल्याशीं लगट करावी ? " पण तो मग कांहीं बोललाच नाहीं.

विवाहित पुरुषाबरोबर सवत पत्करूनही तरुणी लग्न करायला अशा कशा तयार होतात ? हा महत्त्वाचा प्रश्न करून त्यावर चर्चा करावी असें दासोला वाटलें. त्याच दिवशीं नाहीं, पण दुसऱ्या वेळीं त्यानें भास्कररावांना तो प्रश्न टाकला. तेव्हां त्यांनीं त्याला सांगितलें, " लेखक तुला व्हायचं आहे. प्रश्न महत्त्वाचा आहेच. तूं पुस्तकं वाच. त्या विषयाचा सखोल अभ्यास कर. "

दासो त्यावर अधिक काय बोलणार ?

* * *

दासो लेखनाचे धडे घेण्याकरितां रोज भास्कररावाकडे येई. विषय काढी. घड्याळाला एकदां किल्ली दिली कीं ते टिक् टिक् करूं लागतें, तसें विषयाचा उपन्यास केला कीं भास्कररावांच्या तोंडाचें घड्याळ टिक टिक् करूं लागे, हा दासोचा नेहमींचा अनुभव. पण उषेच्या गैरहजेरींत दासोला निराळाच अनुभव येऊं लागला. तें त्याच्या मनासारखें चालेना. त्याला त्याबद्दल आश्चर्य वाटल्यावांचून राहिलें नाहीं.

तोच अधूनमधून नीलाचा विषय काढी. तिला उत्तर पाठविलें असतें तर काय झालें असतें ? उत्तर न दिल्यानें मूक संमति समजून ती एखाद्या वेळीं अचानक घरीं यायची सुद्धां ! ती आली तर काय कराल ? तिनें रोकडा सवाल टाकला तर काय उत्तर द्याल ? नीला घरीं असायला आणि उषामाई घरीं यायला गांठ पडली, दोघी एकत्र आल्या, तर काय होईल ? माईना नीलाचें पत्र दाखविणार काय ? त्यांनीं पाहिलें तर काय वाटेल ? त्या गहजब नाहीं का करणार ? अशा तऱ्हेचे वेंचक प्रश्न धाडस करून दासो भास्कर-रावांना विचारीत असे.

नीलाबद्दल लघळपणानें मिटक्या मारीतही भास्करराव कधीं बोलत नसत, किंवा तिच्याबद्दलच्या तिरस्काराचाही ब्र उच्चारीत नसत. दासोच्या प्रश्नांना

सरळ, सडेतोड आणि रोकठोक उत्तरें द्यायलासुद्धा मुळींच मागेंपुढें पाहत नसत ते !

माहेरीं गेलेल्या उषेचा भास्कररावांच्या घरीं उदय होण्याची वेळ आली. उषा परत आली. तिला आनंद झाला. त्यांनाही बरें वाटलें. माहेरीं घडलेल्या बारिक-सारिक गोष्टी रसाळपणानें सागण्यांत उषेनें मुळींच कसूर केली नाहीं. तिच्या पश्चात् इकडे काय काय झालें हें निवेदन करण्यांत भास्कररावांनीं पण कांहीं कमी केलें नाहीं. भास्कररावांचा म्हणजे सारा उघडा कारभार ! त्याच्याजवळ गुपित असें कांहींच नसावयाचें ! प्रेमाच्या माणसाजवळ गुपित खपत नाहीं. कोणी ठेवीतही नाहीं. ज्याच्यांत गुपित राहतें त्यांच्यांत खऱ्या प्रेमाचा वास कुठून येणार ?

साऱ्या कारभारांत— सारें बोलण्यांत— नीलाचें आलेलें पत्र, भास्कररावांनीं जपून ठेवलेलें, मुद्दाम आपण होऊनच उषेला दाखविलें. आपण लपवावें, उषेनें परस्पर पाहावें, त्याबद्दल आपल्याला छेडावें ! का हा उगाच व्याप ? हीच भास्कररावांची विचारसरणी.

अज्ञात ' नीला ' चें पत्र उषेनें वाचलें. मनुष्यस्वभावाला अनुसरून तिच्या मनांत क्षणभर वादळ उठलें ! भास्कररावांनीं तिला अंतःकरणांतल्या शब्दांनीं निःशंक केलें. त्याच्या ' प्रेमाचा ' प्रवाह अप्रतिहत खळखळूं लागला !

उषा आली हें दासोला माहीतच नव्हतें. तो मध्येंच चार दिवस कोठें बेपत्ता होता. तो ज्या वेळीं भास्कररावांकडे आला, त्या वेळीं उषा—भास्करराव मोठ्या मजेनें हंसत चहापान करीत होतीं. दोघाच्यामध्यें ' नीला ' चें तें सुप्रसिद्ध पत्र पडलेलेंच होतें. त्यावरच त्यांची चर्चा मोठ्या गमतीनें चालली होती !

" ऑं ? माई ! आलांत कधीं ? " दासोनें विचारलें. बोलतांना त्याचें लक्ष मध्यें पडलेल्या पत्रावर गेलें. त्यानें हंसून म्हटलें, " माई, नीलाचं पत्र वाचलंत वाटतं ? "

" वाचलं. " हंसून, तिरप्या नजरेनें पतीकडे पाहत ती उत्तरली.

" माई, बरं झालं तुम्हीं लवकर आलात. नाहीं तर—" दासो एवढेंच म्हणून सहेतुक तिच्याकडे व भास्कररावांकडे पाहत थांबला.

" नाहीं तर काय झालं असतं ? बोल. थांबलास कां !—" उषा म्हणाली.

" आम्हांला दुसऱ्या ' माई ' आल्या असत्या ना ? " दासो मिस्किलपणानें म्हणाला.

" मग अजून येऊं देत कीं ? बिघडणार आहे काय त्यांत माझं ? " उषा हंसतच म्हणाली.

" तुमचं कांहींच बिघडणार नाहीं ? पाहा बरं ? मग म्हणाल त्या येणारच नाहींत; अजून असं कांहीं कळलेलं नाहीं ? " दासो उषेला चिडविणाऱ्या बुद्धीनें खोंचून म्हणाला.

" येऊं दे रे ! महासागराला किती तरी नद्या मिळत असतात. सागराला हव्या असतात ! मिळालेल्या एका नदीला तो दुसरीकरितां परतही लोटीत नाहीं. " उषेनें सहज सांगून टाकलें. त्यावर दासो काय बोलणार ? तिघेंही खूप हंसलीं मात्र ! तरी पण दासो जातां जातां उषेला उद्देशून म्हणालाच, " माई, नीलाचा शोध काढून, तिला उत्तेजन देऊन एक दिवस घरीं आणल्याशिवाय राहाणार नाहीं ! मग माझ्यावर रागावूं मात्र नका हं ? "

* * *

" उषा, उषा ! काय करते आहेस ? चहा का ? मग—" भास्करराव जरा घाईनें, गोंधळलेल्या स्थितींत आंत येऊन म्हणाले, " आणखी एक चहाचा जास्त कप कर. – मला प्रेमपत्र लिहिणारी नीला बाहेर आली आहे पाहा आतांच !—"

" अं ? नीला आली का ? नीला ऽऽ ? " चमकून उषेनें म्हटलें. बरें तर बरें ! नाहीं तर हातांतला साखरेचा डबा खालीं पडायचा नी सारा साखऱ्या जमिनीवर सांडायचा !

नीला आली आहे म्हणताच उषेची एकदम इतकी तारांबळ उडाली. " पाहूं दे तरी ती नीला कोण— कशी आहे ती आधीं मला !– मग चहा करीन. " असें म्हणत उषा चटकन् उठली व बाहेर यायला लागली.

भास्कररावांच्या बरोबर उषा बाहेर आली. बाहेरच्या बैठकींत ती धडधडत्या हृदयानें व कावऱ्याबावऱ्या डोळ्यांनीं पाहूं लागली. " कुठें आहे

नीला ? " असें विचारणार होती उषा, तोंच भास्कररावांनीं मागें वळून व समोर बोट करून म्हटलें, " उषा, ही पाहा नीला. "

तो दासो होता. आणि निगरगट्टपणानें त्या पतिपत्नीकडे पाहत होता.

" पाहिलीस नीला ? "

" इश्श ! म्हणजे काय ? "

" अग, ' नीला ' नांवानं यानंच तें प्रेमपत्र लिहिलं होतं. आज सकाळीं त्यानं आपल्या अपराधाचा कबुलीजबाब मजजवळ दिला. " भास्करराव म्हणाले. " आजकालचे विद्यार्थी असे चावट असतात. गुरुजीला देखील बनवतात. "

उषेनें प्रश्नार्थक दृष्टीनें दासोकडे रागारागानें पाहिलें.

" लेखकाला परकाया-प्रवेश करतां यावा लागतो म्हणतात, तो करून पाहिला मीं. " दासो म्हणाला.

" चांगला लेखक होशील ! " भास्कररावांनीं दासोला हंसत तोंडभर आशीर्वाद दिला.

" फाजील आहे झालं, दासो. " हंसत उषा आंत चालती झाली.

" फाजिलपणा केला मीं; पण अशाच चांगल्या ठिकाणीं प्रेमाची प्रक्रिया पाहणं चांगलं असतं. हाच अनुभव मोलाचा—मार्गदर्शक असतो. " भास्कर-रावाकडे पाहत दासो पुटपुटला.

# नटवर्य भिकारी : ४

तें पुण्यक्षेत्र. स्थळ खरोखरच नितांतरमणीय ! सर्वांना निसर्गरूप ईश्वराचें साक्षात् दर्शन घडविणारें तें ठिकाण. मीं कीर्ति ऐकली होती, पण प्रत्यक्ष तें पाहण्याचें भाग्य मात्र आजपर्यंत मला लाभलें नव्हतें. तो सुयोग मीं व विठूकाकांनीं यावेळीं मुद्दाम घडवून आणला होता. त्या पुण्यभूमीवर पाय ठेवतांच, तेथील नयनमनोहर सृष्टिसौंदर्यानें आमच्या डोळ्यांना वेड लावलें ! जिकडे पाहावें तिकडे शोभा मूर्तिमंत नुसती बागडत आहे, असें वाटलें. ते सरितेचें विशाल पात्र. शांतपणें अव्याहत वाहणारा पाण्याचा विस्तीर्ण ओघ. पलीकडे बारीक शुभ्र वाळू, सूर्याच्या किरणांत नाना रंगांनीं चमकणारे शिंपले, शंख आणि वाळूचे सुंदर कण ! त्यापलीकडे कांठावर हिरव्यागार तृणांकुरांचा लांबच लांब असा मोलवान गालिचा ! अनेक उंच उंच झाडांची रांग. त्यांचे रम्य आकार. एकीकडे ऐटदार घाटांचा थाट !

सकाळीं पाहिलें; दुपारीं पाहिलें; संध्याकाळीं दृष्टि वळविली. रात्रीचीही शोभा पाहण्याचा मोह आवरला नाहीं. प्रतिक्षणीं सृष्टिसुंदरी नवें नवें सुंदर स्वरूप धारण करून प्रेक्षकांना भान विसरावयाला लावण्यांत मोठी कुशल आणि तत्पर आहे असें दिसलें !

भोळे; भाविक लोक लहानशा देवळांत चिमकुल्या देवतेच्या मूर्तीचें दर्शन घेण्यांत धन्यता मानीत होते. आम्हांला परमेश्वराचें साक्षात् दर्शन निसर्गानें उघड्यावरच घडविलें आहे, असें प्रत्ययाला येत होतें ! त्याच्याच दर्शनसुखाचा लाभ घेण्यात मी बेहोष झालों होतों.

आपल्या आवडत्या आराध्यदेवता प्रातःकाळीं सुंदर बालरूप– यशोदेच्या कान्ह्याचेंच– धारण करतात. मध्यान्हीं ऐन तारुण्यांत आलेल्या धीर– वीर शक्तिमान् अशासारखें आहे असें दिसतें. सायंकाळीं, प्रौढ, धीरगंभीर, प्रशांत, गीता सांगणाऱ्या भगवान् श्रीकृष्णाप्रमाणें भासतात, असें भाविक भक्त सांगतात.

त्या स्थळाचें– तीर्थाचें– तशाच स्वरूपाचें दर्शन खरोखरच आम्हांला वाटलें. प्रतिभावान् कवींची प्रतिभा पदोपदीं नवनवोन्मेषशालिनी कशी असेल याचाच साक्षात्कार त्या अनुपमेय अशा निसर्गदेवतेनें मला तेव्हा पटविला !

चांगले दोन दिवस आम्हीं तेथील मजा पाहण्यांत घालविले. त्या तंद्रींत सर्व इतर गोष्टी आम्ही विसरलों.

अतृप्त मनानें, पण फार वेळ नसल्यानें आम्हांला तेथून निघणें भाग होतें. दुसरे दिवशीं आम्ही निघण्याचें ठरविलें.

शेजारच्याच बनात मोटारस्टँड होता. तेथें येणाऱ्या-जाणाऱ्यांची गर्दी. क्षेत्रावर आलेली मंडळी म्हणजे क्षेत्रस्थांचीं सावजेंच ! क्षेत्रोपाध्ये त्यांची शिकार साधण्यासाठीं येणाऱ्या मोटारीभोंवतीं घोटाळताहेत, जाणाऱ्या मंडळींची मोटारींत जागा मिळविण्यासाठीं धांदल उडाली आहे. मग्रूर एजंट प्रवाशांचे हाल करून, त्यांच्या खिशांतील पैसा छिनावूनही, त्यांना मोटारींत कोंबताहेत, त्यांत आसुरी आनंद मिळवीत आहेत. मळकट, खाकी पोषाखांत वावरणारा बेगुमान बेफिकीर उगाच मध्येंच मोटारीजवळ येऊन पोंगा वाजव, इंजिनच्या झाकणाची उघडझाप कर, असले चाळे करीत आहे. भिक्षेकरी उतारूपुढें हात पसरून, तोंडें वेंगाडून एकसारखें सतावीत आहेत. सोडा–लिंबू, चिवडा–भजीं, बिस्किटें– चंच्या, संत्रीं–मोसंब्री विकणाऱ्यांनीं उतारूंना भंडावून सोडलें आहे ! कुठल्याहि मोटारस्टँडवर नित्य पाहावयाला मिळणारी ही मजा त्या स्टँडवर भरपूर आणि एकसारखी चाललेली होती.

रिकाम्या वेळीं आम्ही त्या स्टँडवर अहेतुकपणें हिंडण्यांत वेळ काढीत होतों. मजा पाहात होतों.

जगाच्या प्रत्यक्ष अशा इवल्याशा रंगभूमीवर व्यवहारी जगातलीं बाहुलीं नाचत होतीं. धावत्या नाटकाचें तें दृश्य केव्हाहि पाहण्यासारखेंच असतें. मी त्या दृष्टीनें पाहात नव्हतों. विठूकाकाना ती दृष्टी तर नव्हतीच. पण आम्हा दोघांच्याही मनावर त्या ठिकाणच्या दृश्याचा परिणाम होतच होता. मनाची चांगली करमणूकहि होत होती.

" सासूची घागर घे, सासऱ्याला जेवायला वाढ, घराची राखण कर, पोर रडतंय त्याला पाजायला घे, नवरा रागावला त्याची समजूत कर !"

वरील वाक्यें उच्चारून एक भिकारी आपल्या शिकलेल्या माकडाचा खेळ दाखवीत होता. त्याच्या भोंवतीं बघ्याचा घोळका जमला होता. आम्हीही तेथें क्षणभर थाबलो.

वेळ संध्याकाळची होती. सूर्य मावळत होता. आम्ही तेथून परतायच्या विचारांत होतों. जो तो आपल्याच नादात आणि लहरींत चूर होता. बघे माकडाच्या मालकाला— त्या भिकाऱ्याला— पै-पैसा देऊन खूष करीत होते. तोही पैसा देणाऱ्याला तोंडभर दुवा देत होता. माकडाला मुजरा करायला लावून दात्याच्या उपकाराची अंशतः परतफेड करीत होता. आम्ही त्याला कांहींच न देतां तेथून निघालों.

माझ्या मनात त्या वेळीं कसले विचार चालले होते कोण जाणे ! माझें मलाच कळत नव्हते. कसल्या तरी विचारांत चूर होतों इतकें खरें; म्हणून मी कांहीं बोलत नव्हतों.

" सारें जग नाटकी आहे. नाटक करतात, खेळ करतात आणि सारे पोट भरतात. माणसेंही नाटकी आणि तीं माकडासारख्या पशूलाही नाटकी करतात ! " विठूकाका आपल्याशींच पुटपुटले. मी बोलत नाहीं असें पाहून त्यांनीं मला विचारलें, " कसला रे इतका विचार करतो आहेस ? आपली नाट्यसृष्टि अशी भिकारी बनली आहे, तिचा उद्धार होऊं दे. तिला भर-भराटीला येऊं दे, तिचें पोट भरूं दे, अशी परमेश्वराला अनन्यभावाने प्रार्थना करण्यांत तर गुंगला नाहींस ? "

" होय. " कांहीं तरी उत्तर द्यावयाचें म्हणून मनाच्या अर्धवट स्थितींत मी उत्तरलों.

" मग त्या माकडाचा खेळ पाहून त्याला सक्रिय सहानुभूति कां दाख-विली नाहींस तू ? " विठूकाका खंवचटपणें म्हणाले, " नाट्यकलेचा उद्धार नुसतें बोलून होत नसतो कधी ! त्याच्याकरितां यथाशक्ति पैशाला चाट लावून घ्यायला नको ? तू आतां पैसा दिला असतास तर त्या माकडानें आपल्या अभिनयाचें चीज करणाऱ्या तुला सानंद मुजरा केला नसता ? "

त्यावर मी नुसताच हंसलों.

पुढें चालूं लागणार इतक्यात त्या बघ्यांच्या बाजूला जरा दूरच साचिंतपणें उभा असलेल्या एका भल्या गृहस्थाकडे सहज आमची दृष्टि गेली. त्यानेंही आम्हाला पाहिलें! ‘काय या माकडचेष्टा चालल्या आहेत? काय पाहायचा आहे तो चावटपणा? लोक मूर्ख आहेत.’ अशा अशासारखे काहीं एकाच जातीचे विचार त्याच्या व आमच्या डोक्यात आले असावे कदाचित्! आमच्याकडे व त्या जवळच्या घोळक्याकडे पाहात तो भला गृहस्थ किंचित् गालातल्या गालात हंसलासें वाटलें. आमचेही गाल तशा तऱ्हेच्या हास्यानें सुरकुतले गेले. ही क्रिया मनांत वरील विचार येऊनच घडली असावी.

समान-विचारी भेटले असें वाटून कीं काय कोण जाणे, तो गृहस्थ हलकेच आमच्या समोर येऊन ठाकला. त्यानें पोलिसी थाटाचा आम्हाला सलाम करीत सभ्य भाषेंत विचारलें, “काय रावसाहेब? आपण पुण्याहून आलात?”

आम्ही मानेनेंच ‘हों’कार भरला.

ओळखपाळख नसता, नुसते आमच्याकडे पाहून आम्हांला त्यानें ‘रावसाहेब’ ही प्रतिष्ठित पदवी बहाल केली. मला बरें वाटलें. विठूकाकांची तर मान ताठ झाली, छाती पुढें आली.

तो गृहस्थ खरोखरीच भला दिसला. त्यानें आपली दाढी गुळगुळीत घोटली होती. मिशांचे आकडे ऐटदार वळविले होते. डोकीवर जांभळ्या रंगाचा जरीकाठी बुगडीदार रुमाल झोकात बांधला होता. जुना–मलिन होता तो. पण बांधण्याची त्याची ढब मनात भरण्यासारखी होती. पांढरा शुभ्र शर्ट, त्यावरच जरा भारीपैकी- किंचितसा जुना वाटणारा– हंटिंग कोट त्याच्या शरिराचें सौंदर्य खुलवीत होता. हिरव्या रुंदट काठाचें जाडसेंच पण घुवट धोतर कांचा मारलेलें, त्याच्या ठिकाणची तडफ प्रतीत करण्यासारखेंच वाटत होतें. पायांत कोल्हापुरी, तेल लावलेल्या, तांबड्या हिरव्या रंगाचे गोंडे असलेल्या वहाणा चांगल्या करकरीत होत्या, हें तो जवळ येतांना त्याचा करकर आवाज कानीं आला, त्यावरून कळण्यासारखेंच होतें.

दोन भिवयांच्यामध्यें चमकदार गंधाची टिकली त्यानें ठेवून दिली होती. हातांत, चांदीची मूठ असणारी बारिकशी वेताची छडी पोलीस वापरतात, तसलीच छडी त्यानें घेतली होती. त्यावरून तो पोलिसातला असावा, असा कयास करणें अवघड नव्हतें. डोळयांतली चमक, तो तीव्रबुद्धीचा असावा याची साक्ष पटवीत होती. आणि तो आमच्याशीं सलगीनें बोलूं लागल्यावर तर त्याची बुद्धिमत्ता विशेष आहे हें निश्चितच वाटलें आम्हाला.

पुढें येऊन तो आमच्याशीं बोलूं लागला. त्याचा आवाज, शब्दांचे कांहींसे अशुद्ध पण ठसठशीत उच्चार, आणि आदबीनें बोलण्याची त्याची ढब, यामुळें त्याचें बोलणें ऐकावेंसें मात्र वाटलें.

"तुम्ही कोण ? इथलेच राहणारे काय ?" चंची पुढें करीत, कोणाशींहि ओळख करून बोलायला लागायची विठूकाकाना उपजतच खोड. त्या खोडीला अनुसरून त्यांनीं ह्याच्याशीं सुरवातही केली. "काय उद्योग करतां ?" "या शेजारच्या संस्यानचा आहें मी. माझं घरदार आहे. संस्थानांत मला नोकरी आहे. जमीन–जुमला आहे. घरीं बायको, दोन मुलं आहेत. देवाच्या दयेनं ठीक आहे सारं. जातीचा मराठा आहें मी. पण बसणं, उठणं, वागणं सारं आपल्यासारख्या मोठ्या लोकांत असतं माझं. त्यामुळं आपल्याला आनंद आहे. म्हणूनच आपल्यासारखे भेटले, म्हणजे त्यांची ओळख करावी, त्यांच्याशी दोन गोष्टी कराव्यात असं वाटतं !" त्यानें आपली माहिती अगदीं आपुलकीनें दिली. त्याच्या चेहऱ्यावर खरोखरच आनंद चमकल्यासें दिसलें.

"अरे वा ! ठीक आहे कीं मग !" विठूकाकांनीं पानतंबाखू घ्यायचा आग्रह करीत त्याला म्हटलें. आदबीनेंच, पण आमचा मान राखण्याकरितां नम्रपणानें, किंचित् मान लववून त्यानें नकार दाखविला.

"या बाजूला कसे आणि कां आलांत ?" विठूकाकांनीं पुढें पृच्छा केली.

त्याबरोबर त्याची मुद्रा एकदम चिंतातुर झाली असें दिसलें. त्यानें मावळत्या सूर्याकडे, आजूबाजूला एकदां कावरेबावरेपणानें पाहिलें. मध्येंच आवंढा गिळला.

" गांवाला निघालों आहें मी. " तो सांगू लागला. " बीसबावीस मैल जमीन तुडवायची आहे मला. रात्र होत चालली आहे—"

मी आणि विठूकाका त्याच्याकडे पाहूं लागलों. त्याच्या आवाजांत काळजी दिसली.

" माझी घरधनीन आपल्या माहेराला गेली. बाळंतपणाला म्याच पाठविलं तिला. आता दुपारला तिकडची तार आली– बाळंतीण अडली, ताबडतोब डॉक्टरला घेऊन या म्हणून..."

बोलतांना त्याचा कंठ भरून आला. त्याच्यानें बोलवेना दीनवाण्या नजरेनें त्यानें आमच्याकडे पाहून लगेच बाजूला नजर वळवली.

आम्हांला कसेंसेच झालें. काय एकेकावर प्रसंग येतात तरी !

" डॉक्टरला घेऊन तिकडं निघालांत ना तुम्ही ? जरूर न्या. हयगय उपयोगी नाहीं. " विठूकाकांनीं सहानुभूतीच्या स्वरांत त्याला म्हटलें, "घाबरूं नका. सारं कांहीं ठीक होऊन जाईल. देवाचा देव निभावून नेणारा आहे. माणूस उगीच काळजी करतं. त्यांत कांहीं अर्थ नाहीं. वीसबावीस मैल म्हणजे काय, मोटारीला अर्ध्या घंट्याच काम.—"

" रावसाहेब, तसं असतं तर मी इतका कशाला फिकिरींत पडतों ? गांव आडवळणाचं आहे. त्या बाजूला मोटार जात नाहीं. पायीं नाहींतर बैलगाडीन जावं लागतं. मी एकटा जातों, तर पायानंच जातों, पण डॉक्टरांना माझ्या संगतीं चालत कसं नेणार ? आणि ते येतील कसे ? त्याच्यापायीं बैलगाडी केल्याशिवाय काय सोय आहे ? "

" मग उशीर कां करतां ? बैलगाडी भाड्यानें मिळते ना ? "

" मिळती तर काय झालं ? तळावर गाड्या मस्त आहेत. पण– रावसाहेब " बोलता बोलतां तो चांचरला. थांबला. त्याच्या डोळ्यांची उघडझांप झाली. त्याला काहीं बोलायचें होतें. पण त्याचें धाडस होत नव्हतें असें दिसलें.

" डॉक्टरची फी, गाडीचं भाडं– जातां येतां नाहीं तरी आठनऊ रुपये पडतात. माझ्याजवळ थोडे आहेत. ते पुरणार कसे ? पगाराला अवकाश— ज्याला मागावेत तीं आपलीं माणसं रानामाळांत, बाजारहाटाकडे पांगलेलीं. ऐत्या वक्तीं भेटणार कोण ? आपली गरज भागणार कशी ? त्यांत इथं

कोणी ओळखीचं भेटेल, या आशेला गुंतून उभा राहिलों. कुणी भेटेना. दिवस तर बुडायला आला—" तो किती जिव्हाळयानें आणि घायकुतीला येऊन पोटांतल्या गोष्टी सांगत होता. शेवटीं म्हणाला, "रावसाहेब, सांगण्या-सारखी गोष्ट नाहीं. पण तुम्हाला सागायला चिंता नाहीं म्हणून पोटांतलं ओकलों. चार कमी आहेत. डॉक्टरला तयारींत असा, गाडी घेऊन येतों म्हणून सागून आलों आहे. आता काय करावं याची पंचाईत पडली आहे! वेळेवर जातों कसा? बायको भेटते का नाही? काय तिचा अखेर होणार? सार वाईट वाईट डोळयांपुढं दिसतंय, आणि पोटांत ढवळून येतय्!..."

त्याच्या मनाचा बांध फुटला. इतका वेळ कसेंबसें आवरून धरलेलें मन अनावर झालें. त्याच्या डोळयातून अश्रूंचा पूर आणि तोंडातून हुंदक्याचा आवाज, एकदमच सुरू झाला! खिशातला हातरुमाल काढून त्यानें डोळे पुसण्याच्या निमित्तानें तोंड झाकून घेतलें.

विठूकाका गडबडले!

मी कळवळून त्याच्याकडे पाहूं लागलों.

"अरेरे!" विठूकाकांनीं सहानुभूति व्यक्त करण्यासाठीं एकच उद्गार काढला. त्या गृहस्थाच्या हृदयाचें पाणीपाणी झालें!

"माझी प्रेमळ बायको माझ्या दृष्टीला जिवंत पडेल का? तिची माझी दृष्टादृष्ट तरी होईल का? ती मला सोडून गेली तर आकाशच फाटलं! गरिबाच्या संसाराचा उन्हाळा होणार! माझीं कच्चीं-बच्चीं धाय मोकलतील! आई! आई! आमची आई कुठं आहे बाबा? आम्हांला आमची आई दाखवा! आम्हाला आई द्या, म्हणून गळां पडून रडायला लागलीं म्हणजे मला दे माय धरणी ठाय असं होऊन जाईल. रावसाहेब, असं होणार बघा! देव माझी तिची भेट करील का?"

तो हताश झाला! आमच्याकडे पाहण्याचें धाडस त्याला होईना. दूरवर वाटेकडे शून्य दृष्टीनें हताश होऊन पाहात राहिला. डोळयांतून पाणी घरंगळतच होतें! जणूं कांहीं परमेश्वर कोणाच्या तरी मनींमुखीं उभा राहील, आपल्याकडे याच वेळीं धाडून देईल; इतक्यांत कोणी तरी त्याच्याकडे धांवत येऊन, त्याच्या हातीं, चार— रुपये त्याच्याजवळ नाहींत तेवढे— "हे घे.

चालायला लाग, डॉक्टरला ने. तुझ्या बायकोच्या जिवाला धोका नाहीं, भिऊ नकोस– काळजी करूं नकोस. ” असें त्याला म्हणेल; अशीच त्याची अपेक्षा असावी असें दिसलें.

किती कनवाळू, हळवें मन आहे त्याचें! मनांत आलें. माझ्या मनाची चलबिचल झाली. मी विरघळलों पुरता! त्याची अपेक्षा असणारा मीच कां होऊं नये? त्याची नड मींच कां भागवूं नये? अडचणींत पडलेल्या कोणाही सज्जनाच्या उपयोगीं पडलों तर केवढें सत्कृत्य हातून झालें असें होईल!

मनांत आलें तें चटकन कृतींत आणण्याचा मीं संकल्प केला. विठूकाकांकडे पाहिलें. त्यांना म्हटलें, “ विठूकाका, आपल्याला या सज्जनाला कांहीं देतां येईल का? ”

त्यांच्याही मनाची तयारी माझ्यासारखीच झाली होती. जणूं काय मी सुचविण्याची वाटच ते पाहात होते. त्यानीं लगेच कोटाच्या आतल्या खिशातून चामचंची काढून ती डाव्या हातानें उजव्या हाताच्या तळव्यावर उपडी केली त्यांत फक्त तीन रुपये निघाले. विठूकाकानीं तोंड आंबट केलें. “ चार रुपये नाहींत, तीनच आहेत. ” ते त्याच्याकडे व माझ्याकडे पाहात म्हणाले. “ मग? ”

त्याच वेळीं त्या गृहस्थानें आमच्याकडे पाहिलें न पाहिलेंसें केलें.

“ हे तीन रुपये आहेत. एवढ्यावर तुझें भागत असेल तर पाहा. ” असें म्हणत विठूकाकानीं ते त्याला देऊं केले.

तो लाजला, शरमला. आमच्याकडे पाहातच राहिला. पण नंतर त्यानें हात पुढें केला. मोठ्या कष्टानें त्यानें ते घेतले; त्याला हायसें झालें. त्यानें रामराम केला. “ देव तुमच्या रूपानं माझ्या साहाय्याला धावला! देव तुमचं भलं करील. गाडीवाल्याच्या दाढीला एक रुपयाकरतां हात लावून समजूत करीन. परत आल्यावर वाटेल तर एकाच्या ऐवजीं दोन देईन. ”

“ मग पळा तर आतां उगाच वेळ गमावूं नका. ” आम्ही म्हणालों. तोही भानावर आला. त्यानें आमच्याकडे कृतज्ञतेनें पाहिलें. कांठोकाठ ओसंडणारी कृतज्ञता मला यापूर्वी कधींही पाहायला मिळाली नव्हती. पुढेंहि

तो जलद गतीनें निघाला. जातांना पुन्हां पुन्हां रामराम करीतच होता.

त्याची बायको त्याला भेटो, ती सुरक्षित राहो, त्याच्या लेंकरांना पुष्कळ काळपर्यंत आपल्या आईचें कृपाछत्र लाभो, बिचाऱ्याचा संसार साजरागोजरा दीर्घकाळ टिको.

तो दिसेनासा होईपर्यंत त्याच्याकडे पाहात आम्ही एकाच जागीं उभे होतों. वरील विचार मनांत येत होते. आपण आज किती चांगलें कृत्य केलें, या विचाराच्या प्रशांत लहरी मनात एकसारख्या उठत होत्या.

मी बोललों नाहीं. विठूकाकानीं बोलून दाखविलें, " असं कांहीं सत्कार्य आपल्या हातून घडलं म्हणजे मनाला खरोखर किती समाधान मिळतं नाहीं ? " ते मला म्हणाले. मी होकारार्थी मान तुकविली.

चोहोंकडे दिवे लागले होते. सर्वत्र प्रकाशच प्रकाश भरला होता. आमच्या सत्कृत्यामुळें, पुण्यदानानें, सृष्टीला परम संतोष झाला आहे, तिनें तो प्रकाशाच्या रूपानें व्यक्त केला आहे, अशीच आमची खात्री झाली.

आम्ही परत बिऱ्हाडीं जाण्याकरिता चालूं लागलों.

दुसरा दिवस. तोच मोटारस्टँड. वेळ मात्र दुपारची—एकदीड वाजण्याची होती. आम्ही निघालों होतों. आमचे यजमान पोंचवायला बरोबर आले होते. ते आल्यामुळें आमच्या एजंटानें सतावलें नाहीं. मोटरच्या मागच्या हौद्यांत कोंबण्याची, सक्तमजुरीलाही खालीं पाहायला लावणारी, शिक्षा मिळाली नाहीं. चांगल्या पुढच्या जागा मिळाल्या. गाडी भरायला आणि अर्थात् त्यामुळें सुटायला जरा अवकाश होता. दुसऱ्या एकदोन गाड्या भरत आल्या होत्या, त्या गेल्यानंतर आमची सुटायची होती.

आम्ही आमची जागा पक्की करून, वेळ होता म्हणून, आमच्याबरोबर आलेल्याशीं बोलत खालीं उभे राहिलों. गर्दी होतीच. येणारे येत होते. परतीचे लोक सामानासुमानासह गाडीजवळ गर्दी करीत होते.

विठूकाकाचें सहज पलीकडच्या गाडीकडे लक्ष गेलें. पाठमोरा होता तो. तरी पण त्यांनीं त्याला ओळखलें. कालचाच तो दुःखी—कष्टी जीव ! विठूकाकांना वाटलें, तो सासुरवाडीला जाऊन परत आला असावा. त्याला गाठून त्याच्या बायकोची चौकशी करावी. दोन पावलें पुढें गेले ते...

त्याचे हुंदके, त्याच्या तोंडातील शब्द, हातरुमालानें तोंड झांकून घेणें, कालच्याच कृत्याची सारी पुनरावृत्ति ! शब्द कानात पडले; अभिनय पाहिला. विठूकाका भेदरलेच ! त्यानीं माझें लक्ष त्याकडे वेधविलें. "बायको अडली आहे. वीस बावीस मैल जायचं; डॉक्टरला न्यायचं आहे. पाच रुपये कमी आहेत..." ऐकलें हें मींही !

मी बुचकळयांत पडलों. पण मग चटकन् प्रकाश पडला. आमच्या यजमानांना, त्या गृहस्थाकडे बोट करून मीं विचारलें, "तो इसम कोण आहे हो ?"

त खो-खो करून हंसले. "का ? त्यानं तुम्हालाही फसविलं—चकवलं का ? लुबाडलं का ?— अहो तो एक प्रतिष्ठित भिकारी आहे. मोठा हुषार आणि झोंड. तो रडतो—टाहो फोडतो—बायको आजारी आहे, मूल मरायला टेकलं आहे, डॉक्टरला द्यायला पैसे नाहींत... असं काय वाटेल तें, वाटेल त्याला अशा रीतीनें 'बतावणी' करतो कीं ज्याचं नाव तें ! असा बहुरूपीपणा करून तो रोजीं सहजीं पांच सात रुपये मिळवतो."

हें ऐकून आम्ही पुरे चीत झालों. माझी तर चांगलीच जिरली. मीं नाटकें लिहिलीं, रंगभूमीवर आणलीं. नटांना अभिनय शिकवला, उत्तम शिक्षकानें शिकविलेला पाहिला अमक्या नटाचा अभिनय सुंदर, तमक्याचा अभिनय गचाळ ! अभिनय समजण्याची अक्कल मलाच उत्तम, अशी घमेंड बाळगणारा मी. त्याच मला एका भिकारी नटानें चांगलेंच जिरविलें. त्या प्रतिष्ठित नटवर्य भिकाऱ्यानें मला बनविलें म्हणून राग येण्यापेक्षां, मला त्याचा अभिनय कळला कसा नाहीं, मी चकलों—फसलों कसा, अशा विचारानें माझा मलाच राग आला. मला कांहीं बोलतांच येईना !

आमचे विठूकाका शांतिब्रह्माचे अवतार ! त्यांनीं विशेष मनावर घेतलेंच नाहीं. बाकीच्या बावी बाजूला सारून त्यांनीं यजमानांना विचारलें—-

"त्याला नोकरी आहे, जमीन आहे, घरदार आहे, मुलं आहेत. नाहीं का हो ?—"

"हो, सारं कांहीं आहे ! चांगला गब्बर आहे तो !"

"मग तो भिकारी कसा ?—-"

" सोंगाडेपणा करून तो रोज अशी भिक्षा मागतो म्हणून !"

" पण तो आपली अभिनयकला दाखवितो, त्यावर पैसे मिळवितो ना?"

" अगदीं खरी गोष्ट आहे ही!—"

" या पैशांचं तो काय करतो ? "

" तेवढं विचारूं नका !—"

" का ?—"

" तुमच्या नाटक–सिनेमांतले कित्येक लोक, नट, अफाट पैसे मिळवून काय करतात ? रेस, सट्टा, दारू आणि बाहेरख्याली, असं आम्ही ऐकतो हो ! आम्हांला माहित नाहीं. तसंच हा करतो. असे पैसे मिळवितो, आणि संध्याकाळीं गुत्त्यांत जाऊन खिसा रिकामा करतो ! दुसरं काय करणार ?"

त्यांनीं माहिती दिली– ऐकून मला तिरमिरीच आली !

हा नटवर्य भिकारी ! आणि बहुतेक नाटकीही अशा भिकार मनोवृत्ती-चेच असतात. अभिनयाच्या जोरावर असा पैसा मिळवितात–आणि सर्व प्रकारच्या ख्यालींतच उडवितात ! कसा नाट्यसृष्टीचा उध्दार होणार ?

व्यसनी, दुर्गुणी, भिकार-वृत्तीच्या नटामुळें नाट्यसृष्टि नामशेष झाली, हें कारण नाहींच का ?

माझ्या कनवटीचे चार रुपये खर्चून त्या नटवर्य भिकाऱ्यानें मला लुंगावून माझ्या विचारांत एवढीच भर टाकली !

गाडी निघाली. परमेश्वराला, त्या निसर्गरम्य स्थळाला निघतांना नमस्कार केला तसाच त्या सुंदर नटवर्य भिकाऱ्याला कोंपरापासून हात जोडून नमस्कार केला ! यापेक्षां दुसरें काय करणार होतों मी ?

---

# "जागा नाहीं" : ५

मनू आज खूप आनंदांत होती. कारण असें होतें कीं, दुपारी ऑफिसला जातांना तिनें आपल्या पतिराजांना— मुरलीधराला— परत येतांना आपल्या-करितां कांहीं जिनसा आणावयाची आज्ञा केली होती व त्यानेंही हंसत, मोठ्या आनंदानें आपल्या लाडक्या पत्नीची आज्ञा शिरसामान्य केली होती. मनूची कोणतीहि लहानमोठी मागणी तो कधीं फेंटाळीत नसे. त्यात आज त्याच्या पगाराची तारीख. मग तो आज्ञापालनांत तत्परता दाखविणार नाहीं, असें घडणेंच शक्य नव्हतें.

मुरलीधराची ऑफिसांतून यावयाची वेळ झाली, तेव्हां मनूची दारांतून घरांत आणि घरांतून दारांत एकसारखी ये-जा वाढूं लागली. रोजच्याप्रमाणें घड्याळात पाहून चहाकरितां स्टोव्हवर आधण ठेवलें. चहाबरोबर खायला द्यायला नवे रुचकर पदार्थहि तिनें दुपारींच करून ठेवले होते. मनू दारात येऊन उभी राहिली. कोणा स्नेह्याबरोबर मधुकर सावकाश बोलत येत आहे, असे तिनें पाहिलें. मधुकर रिक्तहस्तच होता. स्नेह्याच्या कांखोटीला कागदात गुंडाळलेलें कसलें तरी पुडकें तिला दिसलें. दोघेजण येतातसें पाहून दारांत उभी न राहतां ती घरात शिरली.

जरा वेळानें ती बाहेर आली. तिला मुरलीधर एकटाच दिसला. तो साव-काश कपडे काढीत होता. तिला तो आळसटल्यासारखा दिसला. तोंडाकडे पाहिलें तर, तें उतरलेलें, चिंताग्रस्त; आणि डोळे लालभडक.

तें पाहून मनूचा आनंद मावळला. मनांत चरकलीच ती. मुरलीधराला बरें वाटत नाहीं. तापबिप तर आला नाहीं ? स्वारी प्रसन्न कां नाहीं? नेहमीं सारखें हंसरें तोंड कां नाहीं ? तितक्यांत तिनें टेबलावर इकडेतिकडे— कबूल

केलेलें सामान आणलें आहे कीं नाहीं, हें पाहिलें. तिला कांहींच दिसलें नाहीं. स्नेह्याबरोबरचें सामान त्याचें होतें, आपलें नव्हतें, हें तिनें ओळखलें. सामान कां आणलें नाहीं म्हणून आपण विचारूं, रागावूं, रूसूं म्हणून घरीं पाऊल टाकतांच आपले तोंड एकदम बंद करण्याकरिताच कीं काय, असा खोटा अभिनय करायला सुरवात केली आहे, असा सुद्धां विचार मनूच्या मनांत येऊन गेल्याशिवाय राहिला नाहीं.

मुरलीधर बराच वेळ मनूशीं बोलला नाहीं. आरामखुर्चीवर अंग टाकून डोळे मिटून तसाच स्वस्थ पडून राहिला. मग मात्र मनूला राहवेना. ती जवळ गेली. त्याच्या डोक्याला, अंगाला हात लावून तिनें पाहिला. रागावण्याच्या सर्व कल्पना ती क्षणार्धांत विसरून गेली. मृदु, प्रेमळ स्वरात तिनें जरा घाबरूनच विचारलें, " असं काय आज वागायचं तें ? बोलायचं कां नाहीं ? काहीं होतंय् का ? इतकं चिंतुतार कां असायचं ?––"

मनूच्या प्रश्नांना, मुरलीधरानें तिच्याकडे अतिशय केविलवाण्या नजरेनें पाहूनच मूक उत्तर दिलें. तिला कांहींच समजेना. ती जास्तच घाबरली. तिच्या डोळ्यांतून टचकन् पाणी आलें. तें पहातांच मुरलीधराला वाईट वाटलें. तो म्हणाला, " मनू, हे काय ? माझ्या शरीरप्रकृतीला कांहीं एक झालेलं नाहीं. तूं कां डोळ्यांत पाणी आणतेस ? पूस ते डोळे अगोदर बघू. "

तेवढ्यानेंच मनूला हायसें झालें. जास्त चौकशी करण्यापूर्वी आंत तयार झालेला चहा आणि त्याबरोबर फराळाचे आणावयाला ती आत गेली. ती दोघांकरिताहि चहा फराळाचें बाहेरच घेऊन आली.

मुरलीधराला आज चहा किंवा फराळाचें घ्यावयाची इच्छा होईना. तो जरा वेळ स्वस्थच राहिला. पण आपण घेतल्याशिवाय मनू घेणार नाहीं, हें ओळखून नाइलाजानें ' हं, घे तूं ' म्हणत चहाफराळाचें पुढें घेतलें.

मनूला स्वस्थ बसवेना. चहा घेत असतांना फिरून तिनें त्याला विचारलेंच, " होय, काय झालं आहे असं ? गप्प कां असायचं ? सुस्कारे का सोडायचे ? ऑफिसांत कुणाशीं भांडण का झालं ? वरिष्ठसाहेब काहीं टाकून उगीचच– अधिकाराच्या जोरावर– बोलला कीं काय ? "

" मनू , ऑफिसात कुणाशीं माझं भांडणही झालं नाहीं आणि— "
मनूला सांगितल्याशिवाय गत्यंतरच नाहीं, या जाणिवीनें मुरलीधर जड शब्दांत तिला सांगूं लागला, " वरिष्ठहि मला कांहीं बोलला नाहीं. पण–" पुन्हा तो अडखळलाच.

" पण काय ?—"

" मनू , ऑफिसातली माझी नोकरी संपली–गेली—–"

" म्हणजे ? " आश्चर्यचकित होऊन घाबऱ्या आवाजांत तिने एकाच शब्दात विचारलें.

" रिट्रेंचमेंटमध्यें ऑफिसनं मला कमी केलं आहे. " मुरलीधरानें शून्य दृष्टीनें कुठें तरी पहात खरी हकीकत कशी तरी सांगून टाकली.

तो हताश झाला.

ती हतबुद्ध झाली. रिट्रेंचमेंट ! त्यापुढें त्याचा किंवा तिचा कांहींच उपाय चालण्यासारखा नव्हता !

* * *

कठिण प्रसंगात पुरुष धीर सोडतात. पण त्याच वेळीं मनाचा खंबीरपणा राखण्याची कला स्त्रियांना चागलीच अवगत असते. मुरलीधराची नोकरी गेली असें ऐकलें त्या क्षणीं मनू थोडीशी गांगरून गेली हें खरें. पण लगेच तिनें आपलें मन सावरलें. तिनेंच मुरलीधराला धीराचे शब्द सांगण्याला सुरवात केली. निरनिराळे मार्ग सुचविले. प्रोत्साहन दिलें. ही एक नोकरी गेली तर गेली! दुसऱ्या कुठेहि नोकरी मिळेल. कुठें तरी सहा तास नोकरीच करायची, मग त्याच ऑफिसांतल्या नोकरीला काय माणिक-मोतीं लागलीं आहेत, म्हणून ती गेली याकरितां खंत करावयाची ? शरीर थकलेलें नाहीं; म्हातारपण आलेलें नाहीं. मिळविलेल्या ज्ञानाची माती झाली आहे असेंहि कांहीं नाहीं. तेव्हां दुसरी नोकरी मिळायला पंचाईत कां पडेल ? असें मनूनें मुरलीधराला सांगायला कमी केलें नाहीं.

" आणि नोकरी मिळालीच नाहीं तर––"

" नाहीं मिळाली तर करूच नये कुणाची नोकरी ! "

" आणि मग काय करावं ? संसार कसा करायचा ? जगायचं कसं ? "

" नोकरी करतां येईल असलेंच ज्ञान मिळालें आहे काय? मिळालेल्या अनेक प्रकारच्या ज्ञानाचा उपयोग दुसऱ्या कोणत्याहि प्रकारानं करून त्यावर संसार चालवितांच येणार नाहीं काय ?–" मनूनें मुरलीधराला निरुत्तर केलें.

" माझी चांगली नोकरी पाहून आई–वडिलांनीं माझ्याशीं तुझं लग्न लावून दिलं. "

" पण–– मी कांहीं आपल्या नोकरीवरच भाळले नव्हतें. स्त्रिया काय पुरुषांची नोकरीच तेवढी पाहतात ? "

मुरलीधर पुन्हां गप्प बसला !

" नोकरी गेल्यावर तुला सुखात ठेवतां येणार नाहीं याबद्दल–" मुरलीधर पुन्हां बोलूं लागला. त्याला तिनें मधेंच थांबवून म्हटलें, " मुळींच वाईट वाटून घेऊं नये. आम्ही स्त्रिया केवळ पैशांत मिळणाऱ्या सुखावरच दृष्टी ठेवून वागतों असं मुळींच समजूं नये. श्रीमंती आली तर त्यावेळीं कसं वागावं हें जसं आम्हाला समजतं, तसंच गरिबींत आनंदानं काल कसा कंठावा याचं बाळकडू आम्हाला चांगलंच मिळालेलं असतं. मिळेल त्यात काटकसरीनं कसं राहावं हें आम्हांला कुणी शिकवावं लागत नाहीं. "

त्या दिवशींच नव्हे, तर त्यानंतर प्रथम कांहीं दिवस मुरलीधर घरीं असला म्हणजे पतिपत्नींत वरीलसारखींच आलटून पालटून तींच तींच बोलणीं होत असत. त्यात मुरलीधराला हें नक्की कळून चुकलें कीं मनू आपल्यापेक्षाहि खंबीर मनाची खचित आहे. एरव्हीं एवढ्या–तेवढ्यावरून डोळ्यांत पाणी आणणारी, क्षुल्लक गोष्टींबद्दल हट्ट धरून बसणारी; तिलाच अशा आपत्कालीं इतकं अवसान, धैर्य आलं कुठून ? पुरुषांच्या स्त्रीविषयींच्या कल्पना नेहमींच अशा चुकत असतात.

अनुकूलता असून पत्नीच्या सुखसोयीकडे दुर्लक्ष करणाऱ्या पतीला ओळखण्याची व म्हणून त्याच्यावर असंतुष्ट राहण्याची, किंवा अनुकूलता नसूनहि पत्नीच्या सुखसोयींकरितां धडपडत असून तसें साधत नाहीं म्हणून त्याकरितां मनाला लावून घेणाऱ्या पतीच्या मनाची पारख करून, तशाहि स्थितींत त्याच्यावर विशुद्ध प्रेम करण्याची उपजत बुद्धि परमेश्वरानें स्त्रियांमध्यें ठेवलेली असते, हा दाखला, मनूनें मुरलीधराला वाणीनें, तसाच वागण्यानेंहि पटविला.

मुरलीधरानें दुसऱ्याच दिवसापासून ' टाईम्स ' मधील ' पाहिजे 'चें सदर लक्षपूर्वक शोधावयास आरंभ केला. ' सकाळ ' मध्यें "नोकरी पाहिजे" या सदराखालीं आपलें वय, ज्ञान, कामाचा खुलासा, अमुक तास काम करण्याची तयारी, हिंदुस्थानात कोठेंहि दूर जाण्याची तयारी, किमान आणि कमाल पगाराच्या आंकड्यांचा अंदाज, वगैरे कळवणारी स्पष्ट पण आर्जवी शब्दांत जाहिरात देऊन टाकली. तिचा काहीं उपयोग होणें शक्य नव्हतेंच. पण उपलब्ध मार्ग चुकवायचा नाहीं, असेंच मनूनें त्याला सांगितलें.

" पाहिजे "चें सदर पाहून त्यांतून पत्ते टिपून घेऊन रोज अर्ज खरडून पाठविण्याचेंहि सत्र त्यानें आरंभिलें.

परंतु वर्तमानपत्रात जाहिरात देण्याचा जसा काहींच उपयोग झाला नाहीं, तसाच अर्जांचाहि कांहीं फायदा मिळाला नाहीं. कित्येक अर्जांचीं उत्तरेंच आलीं नाहींत, तर ज्या अर्जांचीं उत्तरें आलीं आणि मुरलीधरानें मोठ्या आशेनें तीं फोडून वाचलीं, ती सर्व ' जागा भरली ' याच अर्थाचीं !

आता मुरलीधरानें अर्ज लिहिण्याचें सोडून देऊन स्वतः ऑफिसांचे उंबरठे झिजविण्याचें ठरविलें. तो कामावर असताना ऑफिस-कामाकरितां दुसऱ्या अनेक ऑफिसांत त्याला जावें लागत असे. त्याच्याकडेहि पुष्कळ चांगले चांगले दुसऱ्या ऑफिसमधले ऑफिसर येत. त्यामुळें त्याच्या अनेक दाट ओळखी झालेल्या होत्याच. अनेकांचा परिचय, पुष्कळांशीं स्नेह जमला होता. त्याचा फायदा होईल, अशी मुरलीधराची कल्पना. म्हणून नेटानें तो त्या उद्योगाला लागला.

* * *

मुरलीधर दिवसभर भटकून, अनेक ऑफिसात खेटे घालून, संध्याकाळीं घरीं परत आला. त्याच्या तोंडावर हसूं खेळत होतें. मनूला आनंद झाला.

तिनें उत्कंठतेनें प्रश्न केला, " आज आनंदात दिसतेय स्वारी. काय झालं ? जुळलं वाटतं कुठं तरी—"

" नाहीं. " तिला उत्तर मिळालें.

" नाहीं ? नोकरी मिळाली नाहीं म्हणून हसूं येतंय् ? "

" नोकरी मिळविण्यासाटीं फिरत असतां, ज्या जगाच्या गंमती मला कळल्या, जे मनुष्य स्वभावाचे अनुभव थोडक्यांत मला मिळाले, त्याचं मला हसूं येत आहे. त्यापुढें मला नोकरी मिळाली नाहीं याचं कांहींच वाटत नाहीं."

" कसले ते अनुभव ? "

" सर्व ऑफिसातून सरास "जागा नाहीं" हें एकच खणखणीत उत्तर मला मिळालं. विश्वाला व्यापून राहाणारा परमेश्वर जसा एकच, त्याचप्रमाणं सर्व ऑफिसाचं एकचएक उत्तर "जागा नाहीं" सर्वांत मोठा हा अनुभव."

" तें समजलं मला. "

" पण तो अनुभव घेतांना निरनिराळे अनुभव मला आले—"

" तेंच मी विचारतें—"

" ऐक तर, मनू. प्रत्येक ऑफिसांत 'जागा नाहीं' हें ऐकतांच मला वाईट वाटल्याशिवाय, माझी निराशा झाल्याशिवाय कशी राहील ? "— मुरलीधरानें सांगायला सुरवात केली. " मी एका मोठ्या ओळखीच्या ऑफिसर-कडे त्याच्या ऑफिसात गेलों. नावाचं कार्ड पाठविलं. त्यानें भेटीला बोलावलं. जवळच्या खुर्चीवर बसवून घेतलं. हातांतलं काम बाजूला ठेवलं. हंसून मोठ्या आनंदानं माझं स्वागत केलं. चहा-सोडा आणायला प्यूनला फर्मावलं. चिरूट पुढं केला. मला बरं वाटलं. शकून तर उत्तम आहे अशी कल्पना केली. 'फार दिवसानीं भेटलात, हल्लीं फार महाग झालात !' वगैरे म्हणून आमच्या ऑफिसांतल्या गोष्टी काढल्या. माझ्या वरिष्ठांबद्दल, मोठ्या साहेबां-बद्दल विचारपूस चालविली. माझ्या कामाची स्तुति केली. 'मी त्या ऑफिसांत आता नाहीं. रिट्रेंचमेंटमध्यें ऑफिसनं मला कमी केलं आहे.' असं मीं सांगितलं तें ऐकून तो चकित झाला. माझ्याबद्दल हळहळला. माझ्याबद्दल चांगलीच सहानुभूति त्यानं मला दाखविली. मला नोकरी मिळण्याची आशा वाटूं लागली. म्हणून बोलण्याच्या ओघांतच त्याच्याजवळ 'आपल्या ऑफिसात नोकरी मिळवावी म्हणून आलों आहें.' असं मोठ्या धीरानं सांगितलं. त्याबरोबर त्याची मुद्रा एकदम बदलली. आवाजांत फरक झाला. त्यानं गडबडीनं आपल्या कामाला सुरवात केली. त्यानं एकदा जे

कामात तोंड खुपसलं तें तो वरच काढीना. गरजवंताला अक्कल नाहीं, म्हणून मी तसाच विकाटी धरून बसलों. किती तरी वेळानं तो त्यापल्या खुर्चीवरून उठला, कपडे केले, अगदीं अनोळखी गिऱ्हाईकाला तिरस्कारानं सांगतात, त्याप्रमाणें ऑफिसांतून बाहेर पाय काढीत असता 'आमच्याकडे जागा नाहीं' एवढेंच तो बोलला आणि त्यानं आपला मार्ग सुधारला.

" माझा प्रथम सन्मान करणारा व शेवटीं तिरस्कारानें पाहात जागा नाही म्हणून सांगणारा-एकच ! पण त्या एकातच केवढा तिथल्या तिथें फरक !

" मी तिथून बाहेर पडलों. दुर्दैवाचे दशावतार पाहण्याशिवाय मला गत्यंतरच नव्हतें, म्हणून जीव मुठींत धरून दुसऱ्या ऑफिसात गेलो.

" आमच्या ऑफिसातहि रिट्रेंचमेंटची धामधूम चालू आहे. नुकतेच चार प्यून्स कामावरून दूर केले. तिघाच्या मूळच्या आठ रुपये पगारात तीन तीन रुपयांवर काट मारला आहे. आणखी किती लोक कमी होणार आहेत कोण जाणे ! तेव्हा आमच्याकडेही " **जागा नाहीं** " असंच सडेतोड उत्तर मिळालं.

" एका ऑफीसांत तुमच्याइतक्या 'शिकलेल्या नोकराची जरूरी नाहीं.' असं सांगण्यात आलं.

" दुसऱ्या ठिकाणीं दरमहा एक रुपया पगारावर तुमच्यासारख्याला राहा म्हणणं म्हणजे तुमच्या विद्येचा उपमर्द करणं आहे, म्हणून तुमच्या लायकीची '**जागा नाहीं**' असं सांगणं भाग आहे." असं ऐकावं लागलं.

तिसऱ्या ऑफिसातल्या अधिकाऱ्यानं मी नोकरी मागण्याकरितां आलों आहें हें ऐकताच मला उद्देशून म्हटलं, " कांहीं जागा आमच्याकडे आहेत, नाहींत असं नाहीं, त्या भरावयाच्याहि आहेत. परंतु, माझीं दोन मुलं मॅट्रिक झालेलीं आहेत, एक पुतण्या बी. ए. आहे. भाचा एम्. ए. होऊन नोकरीसाठीं झुरणीस लागला आहे. तसंच आमच्या हेडक्लार्कचेहि दोन मेहुणे पदवीधर झालेले आहेतच. जागा पंचवीस तर अर्ज पंचवीस हजार येऊन पडलेले आहेत ! अशा स्थितींत आम्हीं आमच्या घरच्या लोकाची सोय पाहू कीं तुमच्यासारख्या दारच्या उपटसुंभाची उठाठेव करूं ? जा तुम्ही. आमच्या ऑफिसात जागा नाहीं !"

" हें सकाळच्या फेरींत झालं. पण दुपारच्या वणवणण्यात त्याहिपेक्षां और मजा आला. No vacancy ' जागा नाहीं. ' अशी ऑफिसच्या बाहेरच ठळक अक्षरांची जंगी पाटी पाहिली. तरी आंत घुसलोंच ऑफिसरासमोर गेलों. त्यानं ' काय ? ' म्हणून विचारताच मीं आपला हेतु कळविला. तो चिडला. माझ्यावर ओरडला, ' **जागा नाहीं** ' ही बाहेरची पाटी पाहिली नाहीं काय ? ' होय पाहिली - पण ' इतकें मी म्हणतों तोंच तो जास्तच खेंकसला. ' बेकाराशीं बोलायला वेळ नाहीं. चला चालते व्हा. ' तरी मी उगाच राहिलों. त्याला तें सहन झालं नाहीं. त्यानें प्यूनला हांक मारली आणि " या बेकाराला धक्के मारून बाहेर घालव. पुन्हां कोणालाहि आंत सोडूं नकोस. " म्हणून फर्माविलं. अर्थात् धक्के घेण्यापर्यंत मी पाळी येऊं दिलीच नाहीं. प्यून जवळ येण्याच्या आतच रस्ता गांठला.

तशाहि स्थितींत सांगताना मुरलीधराला, आणि ऐकतांना मनूला हंसूं आलें.

" इतका प्रकार झाला ? म्हणजे निराशेचा— अपमानाचा कळसच झाला म्हणायचा ? " मनू पुटपुटली, " मग इतकं झाल्यावर पुढं काय ? "

" पुढं काय ? " ' न मागे तयाची रमा होय दासी ' हें जसं लक्ष्मीच्या बाबतींत खरं, तसंच नोकरीच्या बाबतींत असलं पाहिजे." मुरलीधर म्हणाला, " मनू आतां आणखी एक मजा तुला सांगतों, आणि पुढं काय करायचं हें आपण विचार करून मग ठरवू. निर्धार करून आणखी एका ऑफिसच्या उंबरठ्यांत पाऊल घातलंच. आजपर्यंतच्या अनुभवानं मी चांगलाच निढावलों होतों. ' जागा नाहीं ' हे शब्द ऐकण्याची माझ्या कानांला संवयच लागली होती. एका गोष्टीची पुरती शहानिशा झाल्याशिवाय एका बाबतींत संपूर्ण निराशा, अगदी अगतिक स्थिति आल्याशिवाय, मनुष्याला त्याची आशा सुटत नाहीं, दुसरा मार्ग पाहण्याची बुद्धि होत नाहीं हेंच खरं आहे. असाच निर्धार करून मी त्या ऑफिसांत गेलों. त्या ऑफिसचा ऑफिसर युरोपियन होता. मला त्यातल्या त्यांत बरं वाटलं. आपल्या लोकां-पेक्षां हे परकी, नोकरी देण्याच्या बाबतींत निदान न देण्याच्या संबंधानें गोड शब्द बोलण्याच्या बाबतींत तरी जास्त चांगले अशी माझी समजूत, म्हणून

मला बरं वाटलं. त्यानं चौकशी केली. मीं हेतु सांगितला तो साहेब हंसला. माझ्याकडे पाहात त्यानें आपाद मस्तक पाहिलें तो मला म्हणाला, " तुम्ही हिंदू लोक इतके शिकतां सवरतां आणि उपाशी मेंढराप्रमाणें नुसत्या नोकरीच्याच कां मागें लागतां ? आम्हांला नोकऱ्या देतां येत होत्या तोंपर्यंत आम्ही तुम्हांला बोलावून घेऊन नोकऱ्या देत नव्हतों काय ? आता नोकऱ्या महाग झाल्या आणि तुम्हां अर्जदाराची बेसुमार वाढ झाली. आमचा इलाज नाहीं. आमच्याकडे जागा नाहीं म्हणण्याचं माझ्या जिवावर येतं, पण उपाय नाहीं. तूं ऑफिसात आलास तुझी चूक नाहीं. आमच्या ऑफिसच्या बाहेर No Vacancy चा बोर्ड लावायचा आहे. तो रंगवून आलेला नाहीं. म्हणून तूं फसलास. आणि ज्या ऑफिसबाहेर असा बोर्ड नसेल तेथें जागा आहे असं समजून आंत जाशील तर आताच्याप्रमाणेच फसशील ही माझी खात्री आहे. कारण, सध्यां चोहीकडे नोकऱ्यांच्या बाबतींत एकच परिस्थिति आहे, तूं तरुण आणि उत्साही आहेस. नोकरी शोधण्यांत काळ, वेळ, शक्ति खर्चतो आहेस तोच दुसऱ्या एकाद्या उद्योगांत खर्च करशील, तर तुझ्यावर निराश होण्याची पाळी येणार नाहीं. जा, कांहीं तरी स्वतंत्र उद्योग करण्यांत आपल्या ज्ञानाला खर्ची घाल ! "

साहेबानें सिगार फुंकीत मला उपदेश केला आणि त्यानें इंग्रजी नमस्कार करीत मला जाण्याचा इषारा देत आपलें चित्त कामाकडे वळविलें.

मी तेथून निघून हा असा सरळ– त्यानंतर पुढेंहि न जातां घरीं आलों.

" पण मग आतां पुढें ?—"

" नोकरी मिळत नाहीं तर ती करूच नये, असं तूं परवांच म्हणाली आहेस—"

" मग काय करणार ? "

" नोकरीच !—"

" पण मिळत नाहीं. ना ? "

" पण स्वतःची नोकरी स्वतःच करायला काय हरकत आहे ? स्वतंत्र उद्योग धंदा म्हणजे स्वतःची नोकरीच नव्हे काय ?

" स्वतंत्र उद्योग करणार ? तो कोणता ? कसा ? "

" असं विचार. सांगतों. पण तसा उद्योग करायला तुझी सक्रिय मदत पाहिजे आहे. मी दुसऱ्याच्या नोकरीचं— कारकुनी ज्ञानच— तेवढ शिकलों नाहीं. नोकरीपेशांत शिरून मिळविलेल्या आणखी विद्या-कला होत्या त्यावर गंज चढला आहे. त्याला उजाळा देतों. त्याचा उपयोग करीन तर नोकरी-पेक्षांहि मी त्यांत कांहीं जास्त पराक्रम दाखवीन. लक्ष्मीला प्राप्त करून घेईन. खात्री ठेव. "

मुरलीधरानें आपली कल्पना मनूला नंतर सांगण्याचें कबूल केलें.

* * *

लग्नाच्या वेळीं अंगावर घातलेल्या दागिन्यांपैकीं कांहीं वेंचक दागिने मनूनें मुरलीधराच्या स्वाधीन करून, ' बायका प्राण देतील पण अंगावरचे दागिने देणार नाहींत, ' या म्हणीला काळें फांसलें. मुरलीधरानें ते दागिने सराफकट्ट्यावर नेले. गहाण ठेऊन पैसे काढण्यापेक्षां विकून टाकणेंच श्रेयस्कर असें ठरवून त्यानें ते विकले व ' **सर्वारंभास्तंडुलाः प्रस्थमूलाः** ' अशी, आपल्या नव्या उद्योगाची, मनूचे दागिने विकून व्यवस्था केली.

मुरलीधरानें उद्योग आरंभिला. उद्योगाकरतां एक स्वतंत्र छोटीशी जागा घेतली. तेथें तन-मन-धन वेंचून उद्योगाचा पाठपुरावा केला. रात्रभर बसून निरनिराळ्या आकाराचे, नक्षीचे, लहान-मोठे विक्रीचे जिन्नस तयार करावे व दिवसा त्याचा गठ्ठा करून फेरीला निघावें, दारोदार जावें, विक्री करावी असा क्रम चालू ठेवला. त्याच्या दीर्घ उद्योगांत अल्पावकाशांत कल्पनेबाहेर यश व द्रव्यही मिळूं लागलें. तें इतकें कीं, त्यावर त्याचा संसार सुखानें तर चालूं लागलाच, पण मनूचे जे दागिने त्यानें भांडवलांत घातले होते, तसेच दागिने— त्याबरोबर आणखी एक दोन नवेही— त्यानें दीड दोन वर्षांच्या आंत नवे करून मनूच्या हवालीं केलें; तिला आनंदित केले. एक दिवस मनू मुरलीधराचें उद्योग-मंदिर व तेथें तो काय करीत असतो हें पाहावयास मोठ्या कौतुकानें गेली. तिथें तिला काय दिसलें ? No Vacancy ' जागा

नाहीं 'चे बोर्ड– सर्व तऱ्हेचे– कांहीं तयार, कांहीं अपुरे, कांहीं नवे तयार करीत आहे, असें तिनें पाहिलें आणि ती हंसली. तिच्याकडे पाहून तोही मनापासून हंसला.

---

# कांकणभर जास्त ! : ६

विजयेनें विजयशीं लग्न केलें होतें. परस्परांनीं परस्परांना चांगलें ओळखलें होतें; पारखलें होतें. विजया मोकळ्या मनाची, सरळ चालीची, सर्वांशीं मिळून-मिसळून वागणारी, भारी हंसरी, तशीच विलक्षण हौशी.

विजय तसाच दिलदार, निष्कपटी. विजयेवर जितका विश्वास तितकाच त्याच्या मित्रावरही त्याचा.

नागेश विजयचा मित्र आणि विजयेचा चाहता.

विश्रांतीच्या वेळांत विजय, विजया आणि नागेश एकत्र बसत; बोलत. हंसत-खिदळत. अनेक पुस्तकें वाचून तिघेही त्यावर चर्चा करीत. ' नवयुग ' ' समाजस्वास्थ्य ' अशा सारख्यांतील नारीविषयक उत्तान वाटणाऱ्या विषयांचा परामर्ष घेत. त्यावरही मोकळेपणानें बोलत. अशा त्या त्रिकुटाला, तशा वाचनाच्या वेळीं एखाद्या संस्कृति संरक्षक मंडळाच्या पुरस्कर्त्यानें पाहिलें असतें, तर हीं तरुण पोरटीं असल्या तऱ्हेचें वाचून खास बिघडणार, चळणार, आपला आत्मनाश करून घेणार असें निश्चित विधान केलें असतें; डांगोरा पिटला असता. अकांडतांडव केलें असतें. विरुद्ध चळवळही करण्यास कमी केलें नसतें.

विजयेला मोटर चालवायला शिकावयाची हौस आली. विजयला आपल्या आंखलेल्या दैनंदिनीच्या कार्यांमुळें मुळींच वेळ नव्हता. विजयेनें नागेशला विनंति केली. त्यानें ती मान्य केली. नागेशजवळ शिकावयाला विजयनें विजयेला संमति देण्यास कसलाच अंदेशा घेतला नाहीं. तिच्या हौसेच्या आड तो प्रेमळ माणूस कां येईल ?

विजयेचें शिक्षण नागेशकडे सुरू झालें. तो तिला शिकविण्याकरिता आपल्याकडे सकाळीं, दुपारीं, संध्याकाळीं, रात्रीं, पहांटे देखील बोलावूं लागला. ती बेशक त्या त्या वेळीं जाऊं लागली. पहाटेच्या गुलाबी झोंपेची किंवा विजयच्या उबदार ' प्रेमळ ' सान्निध्याचीही विजयेनें मोटार शिकण्या-पुढें कदर बाळगिली नाहीं. केव्हा केव्हां विजयला झोंप लागे. त्यावेळीं त्याची झोंप न मोडतां, त्याला विचारल्याशिवायही ती खुशाल जात असे.

" मी ज्या वेळीं बोलावतों त्यावेळीं तुम्ही कशा येऊं शकतां ? " नागेशनें विजयेला एकदां विचारलें.

" कां बरं ? मला शिकायची हौस आहे. शिष्यानं अशा वेळीं आपल्या वेळेच्या सोयी–गैरसोयी पाहायच्या नसतात. गुरूची वेळ अन् त्याची मर्जी संभाळायची असते. गुरूला प्रसन्न ठेवल्याशिवाय का कुठें कोणतीहि कला मिळते ? ज्ञान प्राप्त होतं ? " विजया उत्तरली.

तरुणाची जात, म्हणेल त्यावेळीं तरुणीचें सान्निध्य ! नागेश विजयेकडे निराळ्या दृष्टीनें पाहूं लागला. आपण बोलावूं त्यावेळीं विजया आपल्याकडे येते. यात तिचाहि आंतरःकोऽपि हेतु तसाच निराळा असला पाहिजे असेंच त्याला वाटूं लागलें.

दर वेळीं तो एकेक पाऊल पुढें टाकूं लागला.

सात पावलें बरोबर चालण्यानें मैत्री जडते. नागेशनें विजयेला आपल्या बरोबर सात पावलें चालविण्याचें मनाशीं ठरविलें.

विजया आपल्या जिवलग मित्राची विवाहित धर्मपत्नी आहे, हें नागेश जाणत होता. पण स्त्रीमोह मोठा दुस्तर आहे.

नागेश बगळ्याच्या जातीचा धूर्त !

विजयेला जवळ बसवून मोटार शिकविताना नागेशनें, आपल्या कल्पने-बरहुकूम ती चालते आहे काय हें पाहण्याचें निश्चित केलें. त्याचीं पावले टाकण्याची तऱ्हा अर्थात् निराळी होती.

त्यानें ठरविलेल्या सप्तपदीच्या प्रकारातील एक पाऊल विजया अगोदरच त्याच्याबरोबर चालली होती. तो वाटेल त्या वेळीं बोलावी–त्या वेळीं ती त्याच्याकडे उपस्थित होई, हीच ती पहिली पायरी.

तिच्याबद्दल त्याला प्रेमोद्भव झाला तो त्यामुळेंच होय. त्या आधारा-वरच त्यानें पुढील पायऱ्या चढण्याची– चढविण्याची कल्पना बसविली.

पहिलें पाऊल पक्कें आहे कीं नाहीं, हें पाहण्याकरितां नागेशनें तोच प्रयोग बुद्धिपुरस्सर करून पाहिला. त्याला विजयेनें यश दिलें. आता तो नेटानें पण सावधगिरीनें पुढच्या उद्योगास लागला.

" आमच्या विजयपेक्षां, गुणानीं, बुद्धीनं, हौसेच्या बाबतींत, किंबहुना सर्वच बाबतींत आपण काकणभर जास्तच आहांत. " संधि साधून नागेशनें अशी विजयेची मनसोक्त स्तुति केली. तिला या स्तुतीनें अति आनंद झाला. स्तुति कोणाला आवडत नाहीं ? मनुष्यस्वभावाचा तो एक सहजधर्म आहे. आपण केलेली स्तुति विजयेला मनापासून आवडली, हें नागेशनें ओळखलें; त्याला आशा वाटली. त्याच्या मतें विजयेनें आपल्या बरोबर दुसरी पायरी ओलांडली.

* * *

विजयेला मोटार चालवितां येऊं लागली. परंतु ती अजून निर्भय व्हाव-याला हवी होती. तिचा तिला आत्मविश्वास यावयास पाहिजे होता. त्या सबबीवर एका संध्याकाळीं नागेशनें विजयेला सांगितलें, " उद्यां पहाटे आपण थोडी दूरची ट्रिप काढूं, म्हणजे तुम्हीं एकट्या मोटार कशी हांकतां, हें अजमावतां येईल. "

तिनें होय म्हटलें. ती दर वेळीं नागेशकडे येतांना आपले आवडते पोषाख आपल्या मनाप्रमाणें बदलीत असे. त्यांतल्या एका विशिष्ट पोषाखात नागेशला ती नितांत मोहक दिसे.

दुसऱ्या दिवशीं निघतांना, " तो पोषाख करून याल का ? " असें नागेशनें तिला सांगण्याचें मोठ्या सफाईनें धाडस केलें.

तिला नको होतें थोडेंच ? तिनें हंसतमुखानें त्याची सूचना मान्य केली. नव्हे, ती तो पोषाख करूनच आली.

तीन पायऱ्या तर आपल्या मनाप्रमाणें विजया चढली, याचा विश्वास, पुढील अवघड चढण चढण्यास, नागेशला कांहीं थोडाथोडका वाटला नाहीं.

नागेशनें विजयेला दूर, म्हणजे भलतेंच दूर नेलें. थेट आपल्या शेती-वरच्या सुंदर बंगल्यांत. तेथें त्याचेंच साम्राज्य. नोकर चाकर सर्व त्याच्या-पुढें थुंकी झेलायला तत्पर.

आपल्या अफाट ऐश्वर्याची बेफाट जादू तिच्या मनावर पसरावी, हा त्याच्या मनांतला हेतु.

तिनें तें वैभव पाहिलें. त्याचें तिला काय वाटलें असेल कोण जाणे. तिला परस्थ–अपरिचित ठिकाणीं गेल्यामुळें पहिल्यांदा जरा कसेंसेंच झालें. पण आपण मोटार किती सहजरीतीनें सुंदर चालविली, असें तिलाच वाटून आनंद वाटत होता. त्याहि स्तुति–सुधेचे घुटके नागेश तिला पाजीत होता, त्यांत ती विसरली.

स्वयंपाक करण्याची नागेशनें तिला विनंति केली. आपल्याला अमुक जिन्नस आवडतात, हें तिला सांगितलें. तिला तें माहीत होतें. तिनें उत्सा-हानें तेच पदार्थ केले.

चवथ्या पायरीवर आपण सुखरूप आलों, हें नागेशला पटलें.

जेवणानंतर विश्रांति झाली. त्यानंतर खेळ. कॅरमनें खेळायचें कीं पत्त्यानें ? प्रश्न आला. विजयेनें म्हटलें, " वाटेल तें. विशेषतः तुम्हांला आवडतो तो खेळ खेळूं. "

आपल्या मनांतलेंच विजयेनें ओळखलें, नव्हे, आपण ज्या पायऱ्या चढतों आहोंत, तिला चढायला लावतों आहोंत, तें तिनें ओळखलें. आप-खुषीनें आपल्याबरोबर यायला ती तत्पर आहे, या कल्पनेनें नागेशला किती किती बरें वाटलें.

खेळतां खेळतांच ‘लपंडावां’त वनमालेनें म्हटलेलें नितांत सुंदर भावगीत

प्रीती मिळेल का हो शेजारीं ?
प्रीती मिळेल का हो बाजारीं ?

आपल्या बेसूर आवाजांत म्हणायला— गुणगुणायला नागेशनें सुरुवात केली. विजयेला हंसूं येऊं लागलें. तिनें त्याच्याबरोबर लपंडाव पाहिलाच होता. ती हंसूं लागली तसा नागेश तिला म्हणाला, “ आम्ही गाणारे थोडेच आहोंत ? तुम्ही म्हणून दाखवा. ”

जरा आग्रह करून घेऊन विजयेनें तें भावगीत आपल्या मधुर आवाजांत त्याला म्हणून दाखविलें.

खरोखर तिलाच तें म्हणावयाला सांगावयाचें होतें त्याला. सांगण्यांत त्यानें पर्याय केला. तो बेमालूम सफल झाला.

हां हां म्हणतां आपण परस्परांना जवळ— अगदीं जवळ— आणणाऱ्या प्रीतीच्या सहा पायऱ्या पार पडलों, ही नागेशला पुरी खात्री पटली. “ प्रीति मिळेल का हो शेजारीं ? ” हा चरण जणूं काय ती आपल्यालाच उद्देशून आळवीत आहे, या संभवनीय भावनेनेंच तो तिच्याकडे पाहूं लागला. ‘ मान्य आहे ’ अशी माननें मूक अनुमति दर्शविण्यांत त्यानें हयगय केली नाहीं.

आता एक पायरी, संपली कीं सप्तपदी पुरी. स्वर्ग आपल्या हातांत ! हें रम्य चित्र त्याच्या डोळ्यापुढें दिसूं लागलें.

कोणाही भावनाप्रधान तरुणीला वश करून घेणें पुरुषाला चुटकीसारखें कसें सहजसाध्य असते, ह्याचा प्रत्यय आपण घेऊं शकलों, या अभिमानाचा पगडा नागेशच्या मनावर बसला. त्याला वाटलें प्रेमाची दिल्ली आतां अगदीं हाताशीं आली. विजया झाली तरी चालू कलियुगांतलीच कीं नाहीं ? कलियुगातल्या तरुणी अशा नसतील तरच नवल !

पण अजून एक पायरी शिल्लक होती. त्याबद्दल नागेश चिंतन करीत होता. ती त्याच्या दृष्टीनें त्यानें ठरविली. त्यानें खेळांत जाणून उमजून विजयेकडून बाजू आपल्यावर उलटवून घेऊन तिला खुष केलें. आपणही त्यांत आनंद मानतों, हें हंसून व्यक्त केलें. आणि बोलण्याचा ओघ रंगात आणून

ज्या बालिका आपल्या प्रियकरविषयक गुप्त गोष्टी-- भल्या किंवा बुऱ्या-- कधीही दुसऱ्याजवळ बोलणार नाहींत-- त्यातलीच एक गोष्ट नागेशनें विजये-जवळ काढून घेण्याचा घाट घातला. विजय-विजयेमध्यें प्रेमकलह होऊन, त्यांत जिव्हारीं झोंबेल असें विजय तिला कधीं बोलला होता काय ? त्याची प्राणांतिक जखम ती कशी सहन करूं शकली ? अशा तऱ्हेचें तिला विचारा-वयाचें होतें त्याला.

घोळांत घालून त्यानें मोठ्या कौशल्यानें तिला विचारलें. आणि काय मौज, विजयेनें तशा पुष्कळ गोष्टींपैकीं एक दोन गोष्टी नागेशजवळ सहज हंसत उघड्या केल्या.

झालें. संपलें! नागेशाला हवें होतें तें श्रेय मिळालें असेंच वाटलें.

त्यानें हाताचीं बोटें मोडलीं. विजयेनें त्याला त्याबद्दल कुतूहलानें विचा-रलें, " हें काय ? पुटपुटतां काय ? बोटं काय मोडतां ? "

त्यानें निर्भयपणानें, प्रेमाची टक लावून तिला म्हटलें, " आपली सप्त-पदी आतां पूर्ण झाली. माझ्या संगतींत तुम्हीं आलांत; आपली मैत्री अढळ झाली. आपण माझ्यावर प्रेम करतां-- याबद्दल मी धन्यवाद देतों. स्वतःला भाग्यशाली समजतों मी ! "

हें ऐकून विजया दचकली. आश्चर्यातिरेकानें डोळे मोठे करून तिनें त्याच्याकडे पाहिलें. ती तत्काळ सारा प्रकार उमगली.

नागेश कलियुगांत आहे, त्याच दृष्टीनें--बुद्धीनें त्यानें आपल्याला लेखलें !

आपण नवयुगांत आहोत याच दृष्टीनें--बुद्धीनें त्याच्याशीं वागत आलों-- वागत आहोंत. चूक झाली आपली. आतां आपणच निस्तरली पाहिजे-- नव्हे सांवरली पाहिजे.

विजयेच्या तोंडांतून पहिला प्रिय शब्द कोणता येतो, याकडे नागेशचें सारें अवधान लागलें !

स्त्रिया, चतुर, चाणाक्ष आणि प्रसंगावधानी किती असतात, याची पुरुषांना सहसा कल्पनाच असत नाहीं. असती तर ?--

अमुक अश्लील आहे, तमुक घाणेरडें आहे, तरुण-- तरुणींनें फलाणें वाचावयाला नको-- असें-- तसें वागावयाला नको, अशाकरितां संस्कृति--

संरक्षक महात्मे, अनाहूत पुढें येऊन बंड पुकारण्याकरितां सरसावलेच नसते.

विजयेनें नागेशला आपला तिरस्कार तर दाखविला नाहींच; उलट अशा काहीं हावभावानें आणि गोड आवाजानें त्याला म्हटलें, "चलायचं ना आता ?"

त्याला निमूटपणें तिच्यापुढें मान तुकवावी लागली.

मोटार चालविण्याची त्याला प्रेमळ आज्ञा फर्मावली तिनें.

तो गाडी हाकायला बसला.

"आल्या वाटेनं जायचं नाहीं. आणखी दूरचा रस्ता नाहीं का ? तितकीच निराळी नवी सृष्टिशोभा पाहूं." ही तिची सूचना नागेशला शिरसावंद्य करण्यासारखी होती.

मध्येंच एक इराण्याचें हॉटेल आढळलें. तिनें 'ओव्हल्टिन्' घ्यायची लाडकी लहर व्यक्त केली. तिच्या मनासारखें वागणें नागेशला परम पवित्र कर्तव्यच वाटल्यास नवल काय !

अगोदर विजयेला नागेशनें मनाप्रमाणें खेळविलें होतें. आतां ती त्याला आपल्या नादावर नागासारखें डोलवूं लागली. नागेश मोटार सावकाश चालवीत असला तरी विजया त्याला लटक्याच रागानें म्हणाली, "जरा सावकाश ना ? इतकी काय घाई लागली आहे ?" त्याला बरें वाटलें.

मध्येंच एक बंडगार्डनसारखें रम्य उपवन आढळलें. तिथें थांबण्याची बळेंच—मनात नसतांही— तिनें इच्छा प्रदर्शित केली.

प्रणयी जोडप्यानें उपवनविहार करावयाचा नाहीं तर कोणीं ?

तेथें हिंडतांना किती सहजपणें तिनें गुलाबाचें घोसदार फूल तोडलें आणि नागेशच्या पुढें स्वतः हुंगून तें 'हें तुम्हाला फार आवडतं नाहीं ?' असें लाजतमुरकत म्हणून पुढें केलें.

त्याला वाटलें या फुलाच्या रूपानें तिनें आपलें प्रेम अर्पण केलें. त्या आनंदांत असतां तिनें त्याला—

'प्रीतिचा भिकारी आलों तुझ्या दर्शनाला...'

'हें गीत येतं का हो सगळं तुम्हांला ?' असें म्हणून गायला उद्युक्त केलें. प्रेमवेडा नागेश गातां येत नसतांहि गायला लागला.

प्रेयसीच्या मनाप्रमाणें कोणा प्रेमवेड्याला वागावेंसें वाटत नाहीं ?

पुन्हां गाडी चालतांना मध्यें किती तरी वेळ ती त्याच्याशीं बोललीच नाहीं. उदास मुद्रेनें त्याच्याकडे पाहात राहिली.

ती बोलती बंद झालेली पाहून नागेशला कसेंसेंच वाटूं लागलें. तिच्या मनानें उलट तर घेतली नाहीं, या विचारानें तो रंजीस आल्यासारखा दिसूं लागला. प्रेयसी आपल्या प्रियकराशीं 'उंदीर–मांजराचा' दुष्ट खेळ पुष्कळदां खेळत असतात.

तो रंजीस आलेला पाहून विजयेला मनांतल्या मनांत हसूं आलें. त्याची ती विषण्णता घालवण्यासाठीं तिनें तोड काढली.

तिनें अशा कांहीं आवाजांत त्याला विचारलें कीं, त्याला आपलें अंतःकरण तिच्यापुढें उघडें केल्याशिवाय गत्यंतरच राहिलें नाहीं. त्याची विषण्णता कोठच्या कोठें पळाली.

तिनें मनाशीं कांहीं पुटपुटल्यासारखें करीत व त्याच्यासारखीं बोटें घालण्याचा देखावा करीत त्याला विचारलें—

"आपण किती– किती चांगले आहांत ! जिला आपल्या सहवासाची जन्माची जोड मिळेल, ती स्वतःला किती धन्य समजेल ! आपल्या हृदयांतल्या प्रेमाचं दान करायला एकादी देखील तरुण रूपवती आपल्यापर्यंत पोंचायला कां आली नाहीं, याचं मला नवल वाटतं. – तसा योगच आला नाहीं, कीं आपण कोणाला तशी संधीच लाभूं दिली नाहीं ?"

अशा प्रश्नांचीं उत्तरें अशा वेळीं, खरीं खोटीं– वाटेल तीं– पुरुष देत असतात; नव्या तरुणीला वश करण्यासाठीं, उघड्या हृदयाचें प्रदर्शन करून, 'तुझ्यासारखीच सखी मला हवी होती– ती आतां मिळाली' अशासारखें बिनदिक्कत सांगत सुटतात; तसेंच हुबेहुब नागेशनें विजयेला सांगितलें.

तेवढ्या वेळांत, बोलण्याच्या नादांत, त्यांची मोटार विजयेच्या दाराशीं केव्हां येऊन ठेपली, हें नागेशला कळलेंच नाहीं. विजयेचें लक्ष होतेंच. आपलें घर पाहून तिला एकदम किती हायसें झालें ! गाडी थांबली. गाडी थांबत असतां, विजया पुटपुटत होती. बोटें घालीत होती, तिनेंही नागेशला आपल्याबरोबर– त्याच्या दृष्टीनें योग्य अशी सप्तपदी पुरी केलीच.

तो तिला " हें काय ? " असा प्रश्न करणार, त्याच्या आधींच मोटारचें दार उघडून ती खालीं उतरली. ती आपल्या फाटकांत शिरली, मागें वळून " येतें अं ?— या आतां ! " असें साभिमान, सहेतुक त्याच्याकडे पाहात तिनें म्हटलें.

—— आपल्याबरोबर सात पायऱ्या चढलें, उतरलें, आणि माझी हक्काची ही दहावी पायरी सहीसलामत आपण गांठली—— साहित्यसम्राट् तात्यासाहेब केळकरांनीं, ' पुरुषांपेक्षां स्त्रिया कांकणभर जास्त असतात, ' ही आपली लाक्षणिक अर्थाची कोटी खूप गाजविली; पण आम्ही स्त्रिया, पुष्कळ अर्थांनीं— कृतीनें– अशा खऱ्या करीत असतों !

नुसत्या पाहण्यानेंच विजयेनें नागेशला तो कसा वागला, आपण कसें वागलों, हें पटवून दिलें इतकेंच नव्हे, तर तुम्हीं कलियुग समजतां– आम्ही नवयुग मानून मोकळेपणानें वागतों; संस्कृतिसंरक्षकवाल्यानीं आमच्यासारख्यांना उपदेशाच्या बाटल्या पाजण्याची गरज नाहीं; आमच्या आम्ही स्वतःला संभाळायला समर्थ असतों; असेंच जणूं काय टिच्चून सांगितलें.

स्त्रिया खरोखरच आम्हा पुरुषांपेक्षां केव्हांही काकणभर जास्त असतात, असें मनाशीं म्हणत नागेशनें आपला मार्ग, ओशाळल्या मनानें आणि जलद गतीनें सुधारला. नाहीं तरी आतां तो दुसरें काय करणार होता ?



## काय करा तें आतां करा ! : ७

जशी अलोट संपत्तीची एकटी एक धनीण ती होती, तशीच निसर्गा-कडून उमाप सौंदर्याची अमर्याद मिळकतही तिच्या वांट्याला आलेली होती.

तारुण्यानें आपलें वैभवशाली– सर्व सुखांचें आगर– असें आपलें रत्न-जडित-कलापूर्ण सिंहासन तिला याच वेळीं हौसेनें बहाल केलें होतें, विरा-जमान होण्यासाठीं.

तिचें ज्ञान कथा– कादंबऱ्या वाचून त्यांतील रसास्वाद घेण्याइतकें, नाटकें, चित्रपटकथा पाहून त्यांतील प्रेमरस मनमुराद चाखण्याइतकें, कवि-तांतील प्रणयाशीं तन्मय होण्याइतकें खचित खचित होतें.

परंतु—

वरील तिच्या सर्व प्रकारच्या सुखांच्या अप्रतिम साधनांत एकच आणि तेंहि फार मोठें– अतुलनीय असें– दुःख होतें, आणि तें म्हणणे तिच्या कुंकवाचा धनी, तिला एकटीला मागें टाकून, जेथून मानवप्राणी कधींही परत येत नाहीं, त्या ठिकाणीं निर्दय होऊन गेला होता.

* * *

खायला-प्यायला कमी नाहीं. ल्यायला, नेसायला उणें नाहीं. दास-दासी हात जोडून ' जी हां ' करीत अष्टौप्रहर समोर उभ्या ! परंतु ऐन सुखाचें मूळच उपटल्यावर बाकीच्या साऱ्या सुखांना काय जाळायचें आहे ?

जोडीचा जोडीदार टाकून गेल्यावर ती रड रड रडली. तिनें धाय मोकलली. काहीं दिवस तर तिनें अन्नाचा एक कण घेतला नाहीं, कीं पाण्याचा थेंब पोटांत जाऊं दिला नाहीं. मग बाकी ऐश्वर्याच्या उपभोगाचें नांवच कशाला ?

असेच कांहीं दिवस लोटले, महिने मागें पडले, वर्षेंही संपत आलीं. कालाबरोबर दुःख ओसरूं लागलें. सुखासाठीं तिचें मन हुरहुरूं लागलें. सुखांची गरज तिला तीव्रतेनें जाणवूं लागली. चैन पडूं देईना.

आणि तिला विचारणार तरी कोण होतें ? ती ज्या सुखाकडे नुसती ओझरती दृष्टि वळवील तें सुख तिच्या पायाशीं लोळण घ्यायला कां कमी करील ? धनिकांनीं कसेंही वागलें, तरी तोंडावर त्याचें कोणीहि कौतुक करतो. फार तर कसलाच उच्चार करीत नाहीं; बोलावयाचें झालें तर पश्चात् कुजबुजतो; हें तत्त्व तिला कोणीं न सांगतां कसें कळलें कोण जाणे ! याउप्पर आपण आपली कुचंबणा करावयाची नाहीं, असें तिनें मनांत आणलें मात्र !— नुसती तिनें बाहेरच्या जगाकडे नजर फिरविली; आणि—

पंतोजीपासून प्राध्यापकांपर्यंत, विद्यार्थ्यांपासून विद्वान् पंडितांपर्यंत अनेक ताज्या तरुणांचा प्रचंड घोळका अहोरात्र तिच्या सभोंवार जमूं लागला. जशा काय साखरेच्या पोत्यावर असंख्य मुंगळ्यांनीं तुटून पडावें !

कोणाबरोबर नाटकाला, तर कोणाबरोबर बोलपटाला ती आपल्या खर्चानें जाऊं लागली ! हंसणें, बोलणें, गप्पागोष्टी यांना ऊत येऊं लागला. कॅरम, पत्त्यांचे अड्डे बसूं लागले. जुनें तें सर्व वाईट, नवें तें सर्व चांगलें, अशा चर्चांना तर ताळतंत्रच उरला नाहीं.

इतकी मजल तिनें हां हां म्हणतां गांठली. मनाला मोकाट सोडलें. परंतु एक गोष्ट, कां कोण जाणे, तिनें आपलें शरीर या क्षणापर्यंत मात्र पवित्रच ठेवलें होतें.

न जाणों, सभोंवार जमणाऱ्या असंख्य तरुणांतून आपला सौंगडी नक्की कोणता करावा, याबद्दल तिच्या मनानें अखेरचा निर्णय दिला नसावा ! आणि तें बरोबरहि होतें. कारण एकाचें रूप तिला आवडे तर दुसऱ्याची बुद्धिमत्ता तिच्या मनांत भरे ! तिसऱ्याचा पोषाख, तर चवथ्याची साखरे-सारखी गोड वाणी ! कोणाचें शौर्य तर कोणाचा नितांत आर्जवी स्वभाव ! या सर्व प्रकारानें ती गोंधळून गेली असल्यास व त्या गोंधळामुळेंच तिचा निर्णय अनिर्णित राहिल्यास तिला दोष कसा देतां येईल ?

" जयजय रघुवीर समर्थ ! " अशी घनगंभीर गर्जना करीत, एक दिवस, एक बऱ्याच उतार वयाचा, तेजःपुंज दिसणारा, दाढीजटायुक्त वल्कलधारी कोणी धर्मावतार तिच्या बंगल्यांत बेगुमान घुसला !

ती सामोरी गेली. धर्मावताराच्या पायीं तिनें मस्तक विनम्र केलें. त्यानें पाहिलें. ओळखलें. तिनेंहि त्याला ओळखलें ! कुंकुमविरहित तिचा भाल-प्रदेश पाहताच त्याचा हृदयसागर हेलावला ! डोळ्यांत अश्रु उभे राहिले ! तिनेंही त्यांना पाहून डोळ्यांला पदर लावला.

ते तिच्या वडिलाकडे जेव्हां येत, राहात, ज्ञान-विज्ञान सांगत, तेव्हा तिच्या बाळपणीं आपल्या वडिलांच्या मांडीवर लोळत, कांहीं न कळलें तरी एकाग्र चित्तानें ती ऐकत होती. ल्हानपणीं तिला त्याची जबरदस्त भीति वाटे. आज तिला त्याच्याबद्दल नितांत आदर वाटला. वडीलच आपल्याला भेटायला आले असें तिला वाटलें ! स्वागत करून तिनें राहण्याचा आग्रह केला. ते राहावयालाच आले होते. त्यांनीं मूक संमति दिली. ते तिच्याकडे राहिले !

ठेवून घेण्याच्या भरांत त्यांची आपल्याला पुढें अडचण काय होणार हें तिच्या त्या क्षणीं ध्यानात आलें नाहीं.

आणि राहतों म्हणतांना, त्या ठिकाणीं तिचे कोणते ढंग पाहावे लागणार आहेत, याची कल्पना त्या धर्मवीराला आली नाहीं !

परंतु अखेर आपलें जें दिसूं नये असें तिला वाटूं लागलें, तें त्यांना दिसूं लागलें. तिची विलक्षण तारंबळ उडूं लागली.

तिच्याकडे येणाऱ्या तरुणांची वर्दळ त्यांच्या दृष्टिपथांतून कशी सुटणार ? आणि ते त्या वर्दळीला थोपविणार कसे ?

नोकराचाकरांकरवीं ती त्यांच्या आन्हिक अनुष्ठानांत रतिमात्र कमी पडूं देत नव्हती. तशी आपल्या सौंगड्यांच्या सहवासाचा लाभ भीतभीत पण मोठ्या धाडसानें ती मिळवीतच होती.

त्यांना राहावें तरी पंचाईत, जावें तरी अवघड; असें तिथलें तिचें दृश्य निरखून मनांत येऊं लागलें. ते मनाशीं हळहळले ! कळवळले !

" हरहर ! काय ही हिची अवस्था ! अश्राप पोर ! दुर्दैवानें तिच्या कपाळीं कुऱ्हाड घातली ! आतां, ती अनीतीच्या– पापाच्या– गर्तेकडे झपाट्यानें धांवते आहे. ही नरकांत जाणार ! सासारमाहेरच्या बेचाळीस कुळांना बट्टा लावणार ! हिचा दोष काय ? अपराध काय ? बोलून चालून स्त्री ! अज्ञानी ! आपणच तिचा उद्धार केला नाहीं, तिला सन्मार्ग दाखविला नाहीं तर आपलें जिणें तरी कशासाठीं ? "

त्यांच्या मनांत आलें कीं तें लगेच आचरणांत आणण्याचा त्यांचा कृतसंकल्पहि झाला. थोरांचें सारेंच थोर म्हणतात तें हेंच !

* * *

ती एकदम बिथरेल, ऐकणार नाहीं, आपल्यालाच हुसकून देईल, असें उग्र स्वरूप त्यांनीं धारण केलें नाहीं. आणि आपला कार्यभाग तर साधतां यावा, म्हणून तिला सांगून आपण एका स्वतंत्र जागेंत राहाण्याची तिच्याकडून व्यवस्था करविली. रोज तिच्याकडे येऊं लागले. आपल्या रसाळ वाणीनें देवादिकांच्या, धर्मांच्या, सद्वर्तनाच्या अनेक कथा तिला सांगूं लागले. " स्त्रियांच्या चालीनें चालावें. स्त्रियांच्या बोलीनें बोलावें. " हें तिला कोणीं शिकवायला नको होतें.

त्यांच्या सांगण्याचा तिच्या मनावर परिणाम होऊं लागला. त्यांचें ऐकण्यांत खूप वेळ जाऊं लागला तिचा. तरुण तिच्याकडे येत, बसत बोलत पण ती त्यांना महाग होऊं लागली, तिच्याशिवाय बैठकींत रंग येईना. सर्वांना वाटूं लागलें, आपली हातची शिकार गेली. देवळांत देव दिसेना. मग भक्त येतात कशाला ? भक्तांची गर्दी आपसुकच कमी होऊं लागली.

हां हां म्हणतां एक वर्ष लोटलें. नकळत ती आपसुक अकालीं संन्यासिनी बनली. त्यानाहि मनांत मोठा आनंद वाटूं लागला. वाममार्गाला जाऊं पाहणाऱ्या एका अजाण जीवाला आपण सन्मार्गाला लावलें, त्याच्या नशिबाचा अधःपात टाळला ! आपल्याला या कष्टमय मार्गांत अपूर्व यश आलें, या विचारांनीं ते समाधानाचा निश्वास सोडूं लागले. स्वतःबद्दल त्यांना विलक्षण अभिमान वाटूं लागला.

* * *

तेवढ्यांत त्यांची बनारसची वार्षिक सद्धर्मपरिषद दाराशीं येऊन ठेपली. परिषदेला त्यांना उपस्थित झालेंच पाहिजे होते. त्यांनीं तिला 'जाणार' असें सागितलें. त्यांना वाईट वाटलें. तिलाहि त्यांची सत्संगति, काहीं काल तरी, अंतरणार म्हणून दुःख झालें. त्यांनीं तिची समजूत घातली. लवकर परतण्याचें आश्वासन दिलें. जवळचे कांहीं सद्ग्रंथ वाचण्यास दिले व ते निघाले.

" महाराज, बनारसहून माझ्याजोगता कांहीं तरी उपयुक्त पदार्थ आणाल का ? " मोठ्या लडिवाळपणानें तिनें विचारलें.

" अवश्य, अवश्य ! कां नाहीं आणणार माझ्या गुणी बाळेसाठीं ? अवश्य ! " धर्मावतारांनीं पितृवात्सल्यानें गद्गदून आशीर्वादयुक्त आश्वासन दिलें तिला.

ते परिषदेकरितां चालते झाले. परंतु ' मागें ही एकटी आहे, कसें होईल तिचें ? दुखणें उलटणार तर नाहीं तिचें ? ' अशी त्यांना धाकधूक वाटत होतीच.

ती एकटी राहिली. गुरुजींनीं घालून दिलेला दिनचर्येचा धडा ती इमानें-इतबारें गिरवीत राहिली. धर्मावतार बनारसहून आपल्यासाठीं काय आणतात, त्या वाटेकडे तिचे डोळे लागले होते.

* * *

सद्धर्म– परिषद यशस्वी करून धर्मावतार योग्य वेळीं परतले. आले ते निवासस्थानीं जाण्यापूर्वी प्रथम तिच्याकडे आले. पहिल्यापेक्षां तिला जास्त आनंद वाटला. क्षेम–कुशल झालें. " काय आणलें ? " असा प्रश्न थोड्या वेळानें तिनें हळूच, पण अति उत्कंठेनें त्यांना केला. त्यांनीं झोळीतून तिच्याकरितां आणलेली एक– त्यांच्या दृष्टीनें अमोल वस्तु बाहेर काढली.

ती वस्तु– मृताची कवटी होती. अल्पमोली पण बहुगुणी ! अधोगति टाळण्यासाठीं हजारों धर्मग्रंथांचीं पारायणें करून जें गळीं उतरणार नाहीं, तें या एका लहानशा प्रात्यक्षिकाच्या योगें सहज समजण्यासारखें आहे, ही त्यांची पुरी खात्री. त्यांनीं ती कवटी तिला दाखविली, समोर ठेविली. तिच्या-संबंधीं खूपच खूपच प्रवचन झोडलें– "तुझी, सर्वांची– मनुष्यमात्राची मरणोत्तर हीच अवस्था आहे. तुझें आजचें सौंदर्य अतुलनीय आहे, पण त्याचें

स्वरूपही पुढें हेंच आहे, हें ओळखून जीविताचें, आयुष्याचें, देहाचें प्रत्येकानें " करा काय तें, आतां करा ! " या साधूक्तीप्रमाणें सार्थक केलें पाहिजे. " असा रोकडा संदेश त्यांनीं तिला अखेर दिला.

तिनें सर्व ऐकलें. तिला पटलें. इतकें कीं, ती कवटी समोर पाहून आणि धर्मावतारांचें त्यावरील प्रभावी प्रवचन ऐकून तिच्या डोळ्यांतून घळघळ घळ अश्रू वाहूं लागले. धर्मावतारांना तें पाहून कृतकृत्य वाटलें. तिच्यावर योग्य तो त्या कवटीचा परिणाम झाला हा भरंवसा त्यांना वाटला. ते आपल्या मकाणाकडे निघून गेले.

* * *

ती झडझडून उठली. धर्मग्रंथ भिरकावले. संन्यासिनी व्रताला तत्काळ रजा दिली. " आपली मरणोत्तर अशी ओंगळ अवस्था होणार ? " कवटीकडे पाहून तिला वाईट वाटलें. " करा काय तें अतां करा " हे गुरुजींचे शब्द तिला पटले. तिनें निश्चय केला. " नाहीं ! मी जें काय करायचें ते आतां करणार. ऐश्वर्याचें, देहाचें सार्थक याचि देहीं, याचि जगीं करणार. "

अलंकार अंगावर चढविले. वस्त्राभरणीं देह नटविला. साजशृंगार केला. दिव्यांचा झगझगाट केला. फुलांची शय्या सजविली. अत्तरांचे सडे घातले. कित्येक महिने विसरलेल्या आपल्या जिवलग प्रिय मित्रांना आमंत्रणें पाठवून आग्रहानें बोलावून आणलें.

आनंदानें, हौसेनें, तत्परतेनें, मित्रांना तिनें त्याच रात्रीं आपलें मन, आपलें गौरांग, आपलें स्वर्गीय सौंदर्य, सर्वांना सप्रेम अर्पण करून त्याचें सार्थक करण्याचा मंगल मुहूर्त साधला.

* * *

प्रकृतिधर्म आणि ज्ञान हीं विभिन्न असतात हें ते धर्मावतार, ज्यावेळीं आपल्या प्रिय शिष्येवर आपण तिला दिलेल्या अमोल देणगीचा—कवटीचा—परिणाम काय झाला आहे, हें कांहीं दिवसांनीं पाहावयास तिच्याकडे आले, तेव्हां तेथील दृश्य पाहून त्यांना पुरेपूर पटलें.

ते उपस्थित झाले त्यावेळीं ती आपल्या एका प्रियकराच्या गळ्यांत गळा घालून खुशाल ऐष-आरामांत पहुडली होती, दुसऱ्याशीं गुज गोष्टी करीत होती, तिसऱ्याकडे प्रेमाचा तिरपा कटाक्ष फेंकीत होती.

धर्मावतारांनीं तें पाहून 'आ'च वासला.

तिनें त्यांच्याकडे नुसतें पाहिलें. शब्दाशिवाय तिनें त्यांना कळविलें—

"आपला उपदेश मला पटला. त्या कवटीचेंच स्वरूप मला पुढें मरणोत्तर प्राप्त व्हावयाचें– म्हणून आपल्या 'करा काय तें अता करा!' या उपदेशाप्रमाणें मी वागतें– असेंच वागलें पाहिजे ना?" असें म्हणत, त्या धर्मावतारासमक्ष आपल्या प्रियकराला आपलें चुंबन घेण्याकरितां तिनें आग्रहानें पुढें ओढलें.

धर्मावतारांनीं त्याच क्षणीं कपाळावर हात मारीत तेथून काढता पाय घेतला. त्यापेक्षां ते काय करणार?

---

# जित आणि जेते : ८

'जितांनीं जेत्यांकडे नम्रतेनें पाहावें, त्यांचे लहानमोठे गुण आणि दुर्गुणही सारखेच वंदनीय मानून शिरोधार्थ आहेत अशीच भावना ठेवावी. आणि जेत्यांनीं जितांकडे, तिरस्कारानें, उपहासानें, टवाळीच्या नजरेनें—— त्यांच्या सद्गुणांकडे ही पाहून हंसावें!' काय चमत्कार आहे!

'जेत्यांची संस्कृती श्रेष्ठ आणि जितांची संस्कृती कनिष्ठ, हास्यास्पद (खरोखरी त्या तशा नसल्या तरीही!) मानण्याकडे जगाची सहज प्रवृत्ति असते! असें कां असावें?'

एकटाच कसला तरी विचार करीत चाललों होतों मी. माझें चित्त व डोळे रस्त्यांतून जाणाऱ्या–येणाऱ्याकडे नव्हते. माझ्याकडे कोणी पाहात असेल, ही जाणीव मला नव्हती. पाय पुढें नेत होते. या हातातील जड पोतडी अधिक जड वाटूं लागली कीं त्या हातांत सहजगत्या जात होती.

ज्या एका घरांतून मी नुकताच बाहेर पडलों होतों, त्या घरीं जमलेल्या चार शहाण्या टाळक्यांनींच ग्रंथ, ग्रंथांचे विषय, ग्रंथकार आणि त्यांची विचारसरणी– इत्यादिबद्दल खूप काथ्याकूट चालविला होता. विषयावरून विषय निघतां निघतां, जित आणि जेते यांचा विषय निघून, त्यावर प्रत्येकानें आपापल्या बुद्धिशक्त्यनुसार अकलेचे तारे यथास्थित तोडले होते. जित आणि जेतीं राष्ट्रें, देश, समाज, कुटुंबें, व्यक्ती, त्यांच्या संस्कृती– असंस्कृती, यांचा खरपूस समाचार घेण्यांत आला होता. त्याचा शेवट होत होत अखेर नागर संस्कृति आणि खेडुताची असंस्कृती यांतीलही भेदाभेद व्यक्त करण्यापर्यंत, आणि त्यामुळे स्वतःची करमणूक करून घेण्यापर्यंत कोणीच कमी केलें नव्हतें !

माझी इच्छा नसतानाही वाटेनें चालतांना तेच विचार माझ्या डोक्यात अजून दंगा करीत होते ! त्या टाळक्यांनीं आपल्या नागर संस्कृतीचा टेंभा पाजळून, मजसारख्या खेडवळाच्याच असंस्कृतीची हेटाळणी तर केली नाही ना ? माझ्याचसाठीं त्या विषयाकडे ते शहाणे नागर वळले नसतील ना ? मनांत आलें आणि माझ्या चालण्याची गति आपोआप मंद होऊन मीं माझ्या बाह्यांगाकडे पायापासून छातीपर्यंत पाहिलें !

गरिबीचा, गबाळ, असा माझा पोषाख– बाह्य देखावा. अन् याचाच उद्धार त्या लोकांनीं केला असला पाहिजे ! बोलतांना माझें लक्ष नाहीं असें पाहून, माझ्याकडेच पाहून, आपापसांत डोळे मिचकावीत होते, हंसत होते मिस्किलपणानें,– हें आतां माझ्या लक्षात आलें आणि कल्पना निश्चित झाली.

मला माझ्या गरीब– गबाळपणाचें वाईट वाटलें नाहीं. त्यांच्या हंसण्याचें हंसूं आलें. त्यापेक्षां त्यांची कींवच आली म्हणा ना !

स्वतःला चांगलें म्हटल्यानें चांगलें ठरता येत नाहीं. आपल्याहून वेगळ्या चालीरीतीच्या प्राण्याला वाईट म्हणून, टवाळीनें हंसल्याने, तो दुसरा खरोखरच वाईट ठरत नाहीं.

पण स्वतःची संस्कृति श्रेष्ठ समजायची; दुसऱ्याची कनिष्ठ मानायची व तिला हंसायचें, टवाळी करायची, ही एक फॅशनच होऊन बसली आहे, त्याला काय करणार? तसें असूं नये हें खरें; पण असतें मात्र हेंही तितकेंच खरें आहे.

महाराष्ट्र-कुटुंब-मालेच्या फिरत्या प्रचारकाचा पेशा मीं पत्करला होता. गांवोगाव, शहरोशहरीं, हातातील कापडाच्या पिशवींत मावतील तितकीं पुस्तकें कोंबून, पेठन् पेठ, घर न् घर टिपणें माझें कामच होतें.

प्रचारकानें पोषाख कसा करावा? झकपक नि मोलवान? प्रचारकाच्या मिळकतीला तो झेंपेल का? पचेल का? बरा दिसेल का? तशा पोषाखानें वावरल्यास एखादा कांटेकोर धनिक– व्यवहारज्ञ व्यापारी, 'कां हो? इतक्या सुस्थित वागण्याइतकें पुस्तकांच्या प्रचारकाला कमिशन मिळतें का?' असें खोचक आणि बोचक विचारणार! घोपटमार्गी गरिबांच्या घरीं गेलों तर 'हा चांगला साहेबासारखा शोभतो आहे, यानें आमच्या दारीं अशा रीतीनें भिक्षा मागावयाला यावें, म्हणजे काय? आम्हांला संकट आणि दर अशा मोलवान् पोषाखाची अशी बेअब्रू.' असलीं सार्थ सुभाषितें कानीं पडल्याशिवाय राहणार कशीं?

पेशाला पोषक, उपयुक्त होणारा, असाच माझा जामानिमा होता. खेड-वळ संस्कृतींतूनच हा खरा सद्गुणच मीं उचलला होता. पायीं चालतांना पादत्राण धुळीनें भरलेलें, नेसतें धोतर मळकटलेलें; या हातांतून त्या हातांत पुस्तकांचें ओझें घेतांना हात अवघडले म्हणजे तेंच ओझें क्षणभर या खांद्या-वरून त्या खांद्यावर घ्यावें लागल्यामुळें, आंगावरच्या कपड्यांची परीट-घडीची छानी कायम कशी टिकणार? शक्य तरी आहे का? बिघडणार, मुरडणार; बावळटपणाचें स्वरूप त्याला येणारच. आणि तें तसें आलें कीं, नागर छानछोकवाले या बाह्यदेखाव्यावरूनच गरीब खेडवळाची संस्कृति ठरवून, त्याला हंसणार, टवाळी करणार!

माझ्या वांट्याला हें नित्याचें होतें. त्या हंसण्याचा, टवाळीचा मला दृढ परिचय झाला होता. मला त्याचें कांहींच वाटत नसे.

बाह्यांगावरून संस्कृति पारखण्याची ही रीत ! अंतरंग तर सहजासहजीं कोणाला कळणें शक्य नाहीं. पण लेबलावरून मालाची परीक्षा, तसें बाह्यांगावरून अंतरंगाची परीक्षा आपण सहज करूं शकतों, अशी घमेंड पुष्कळ लोक मारतात. ते म्हणतात, 'अंगणावरून घराची परीक्षा नाहीं का होत?' पण हें नेहमींच खरें असतें असें कुठें आहे ?

मनाची समता न ढळूं देणारा, न रागावणारा, वाईट वाटून न घेणारा, न चिडणारा मी, पण त्या मलाहि वाईट वाटण्याचा प्रसंग अनुभवावा लागला. वाईट वाटलें मला. आणि तेंहि याच फिरतींत-- फार थोड्या अवकाशांत.

मागल्या घरांतील टोळक्यांनीं केलेली टवाळी मीं मनावर मुळींच घेतली नाहीं. पण त्यानंतरचा तो प्रसंग मला जाणवल्याशिवाय राहिला नाहीं. त्याचें असें झालें होतें—

ती वेळ दुपारीं दोन वाजण्याची होती. मुलांमुलींच्या शाळांच्या मधल्या सुटीची वेळ ती. कडक ऊन पडलेलें; पण शाळांच्या आवारांतून मुलांच्या शाळांच्या आवारांत मुलें, आणि मुलींच्या शाळांच्या पटांगणांत मुली बेगुमानपणानें नाचत बागडत असल्यास नवल नव्हतें.

रखरखत्या उन्हाची त्यांना काय पर्वा असणार ? प्रापंचिकाच्या– संसारासाठीं पाठीवर ओझ्यांचीं कंठाळीं वाहून नेणाऱ्या, दमल्या, भागल्या, कंटाळल्या जिवाप्रमाणें मुलांमुलींचें थोडेंच असणार ?

पिशवींतील पुस्तकांच्या ओझ्यानें जीव जिकिरीला आला होता. छत्री जवळ असूनही, ओझ्याची देवघेव या हातून त्या हातीं करावी लागत असल्यानें, उघडतां येत नव्हती. उन्ह तळपत होतें. टोपीखालून घामाच्या धारा या आणि त्या कानाच्या बाजूनें घरंगळत होत्या. कोटाच्या आंतला सद्रा घामानेंच ओला चिंब झाला होता. वाटेंतील गाड्यामोटारींच्या धांवण्यानें सर्वांगावर सारखी धूळ उडून तोंडापर्यंत त्यानें आक्रमण केलें होतें. खात्रीनें माझा चेहरा भयानक– बावळट– वेडाविद्रा दिसत असला पाहिजे. त्याला माझा इलाज नव्हता.

आता प्रथम कोणत्या उंबरठ्यात पाऊल टाकावें, याचाच विचार करीत चाललो होतो. बाजूला मुलींची भव्य शाळा लागली. पुढें खूप मोठें पटांगण होतें. मुली धावत होत्या, पळत होत्या, मारामारी करीत होत्या. हंसत होत्या. खिदळत होत्या. त्याच्या किंचाळण्यानेंच आणि संमिश्र गोंगाटानेंच नव्हे, तर तेवढ्यात मधली सुटी संपत आल्याची घंटा घणघणली आणि त्यामुळें माझें लक्ष त्या पटांगणाकडे वळलें. पाहण्यांत हेतू कांहींच नव्हता. मनांतही कांहीं आलें नाहीं. मुली आपापल्या क्लासांच्या रोखानें धांवूं लागल्या. कांहींजणी दोन–दोन– चार–चार जणींच्या घोळक्यानें अजून, या कोपऱ्यांत, त्या कोपऱ्यात बोलत तशाच उभ्या होत्या. बाजूची दृष्टि काढली नि समोरच्या रस्त्यावर सरळ लावली. शाळेच्या दुसऱ्या टोंकाजवळून, रस्त्यानेंच एक मुलगी एका हातांत एकदोन वह्या, एखादुसरें पुस्तक घेऊन येत असलेली मला दिसली. तिची दृष्टि खालीं वळली होती. चाल सावकाश होती. नेसलेलें वस्त्र चुरमुळलेलें, कसें तरी झालेलें होतें. खालच्या मानेनें ती चालत समोरून येत असल्यानें तिचा भालप्रदेश थोडासा स्पष्ट दिसत होता. घामाचे थेंब त्यावर तरारत होते, पण ते टिपण्याचेंहि तिला भान नव्हतें. मला ती एक कारुण्याची मूर्तीच वाटली.

मी सावकाश चाललों होतों; तीही तशीच सावकाश येत होती. पण अल्पावकाशांत आम्ही समोरासमोर आलों. माझें लक्ष तिच्याकडे गेलें. तिनेंही अजाणतां– अहेतुक– त्याच वेळीं किंचित् वर पाहिलें.

पाहताक्षणींच मीं तिला चटकन् ओळखलें. बरेच दिवस माझ्या शेजारीं राहणारे, मनमिळाऊपणानें व स्वभावानें गोडपणें वागणारे म्हणून माझे स्नेही झालेले गंगुनाना शेवडे, यांची धाकटी बहीण, ती शरयू शेवडे. नक्की तीच. खात्री झाली माझी. मीं तिला ओळखले, पण तिनें मला ओळखलें नाहीं. लक्षांत आलें नसेल तिच्या. खालच्या मानेनें पुन्हां ती चालूं लागली. मी थबकलों. तिच्याकडे वळून– माझ्या आंगावरून ती जात असतां, दहा-पांच पावलें पुढें गेली तरी— मी तिच्याकडे पाहातच राहिलों. बदली झाल्यामुळें गंगूनाना शेवडे आमच्या शेजारचें बिऱ्हाड उचलून येथें आले. तीन वर्षें तब्बल झालीं होतीं त्या गोष्टीला. मी तें पार विसरून गेलों होतों.

पण शरयू दृष्टीस पडली आणि मला मागल्या साऱ्या गोष्टींचें एकदम स्मरण झालें.

गंगुनानांचा घरोबा आणि ही शरयू तर काय, जवळ जवळ बारान् बारा चोवीस तास बहुतेक माझ्याच घरीं असायची. बोलणें गोड. मनाची मोकळी, हुशार, सालस नि प्रेमळ. त्यांच्या घरचें वळण देखील कसें, कित्ता गिरवण्यासारखें राखीव आणि रेखीव.

तीन वर्षांनीं अशी अचानक शरयूला पाहिल्यावर गंगूनानांची, त्यांच्या घरच्या साऱ्या लहानथोरांची पुसतपास केल्याशिवाय तसेंच पुढें जाणें, माझ्या– खेडवळ– जुन्या संस्कृतीला ( किंवा असंस्कृतीला ) मानवणें अशक्य होतें.

शरयूनें ओळखलें नाहीं. नसेल ओळखलें ! तिचें लक्ष नसेल— कल्पना नसेल ! मला तरी हा वेळपर्यंत कुठें होती कल्पना ? ती पुढें गेली तरी तिला हांक मारणें, थांबवणें, दोन शब्द तिच्याशीं बोलणें हें माझें कर्तव्यच होतें. शरयू माझ्याशीं मनमोकळ्या प्रेमळपणानें वागे, मलाही ती फार आवडे. आपल्या आवडत्या माणसाची अचानक भेट व्हावयाचा योग आला असतां तो टाळणें, हा कुठला न्याय ? न्याय नव्हे अन्यायच––

भरदिशीं मनांत विचार येऊन गेले. मीं मागें वळून तिला निःसंकोच मनानें हाक मारली ' शरयू ! ए शरयू !—'

ती थांबली–– चमकली ! आश्चर्याची मुद्रा करून तिनें माझ्याकडे पाहिलें. मी हंसरी मुद्रा करून तिच्याकडे परत चाललों. ती पाहात होती. अजूनही तिनें मला ओळखलें होतें कीं नाहीं कोण जाणे ! पण––

मी शरयूला पाहिलें, ओळखलें. हांक मारली. ती थांबली. ब्लाउझच्या खिशांतला हातरुमाल काढून कपाळावरचा घाम टिपूं लागली. तोंपर्यंत मी तिच्याजवळ ठेपलों. मला अतिशय आनंद झाला होता. पण जवळ जाऊन स्थिर दृष्टीनें तिच्याकडे पाहिलें तेव्हां माझ्या हृदयांत एकदम धस्स झालें ! शरयूच्या कपाळीं कुंकू नव्हतें. चेहरा उदास, करुण, वर्ण फिकट असा दिसला.

तिचें लग्न झालें केव्हां ? त्यानंतर तिच्यावर आकीर्शीची कुऱ्हाडही अशी पडली कधीं ?–– आमच्या शेजारीं असतांना ती कुमारी होती. तिचें लग्न

करण्याचा विचार गंगुनानांचा नव्हता. त्यांनीं आपल्याला ही मंगल आणि अमंगलही– अशी कसलीच वार्ता पत्रानें कधींच कळवली नाहीं !

आतां शरयूशीं काय आणि कसें बोलावें ? तिला काय विचारावें ? कसें विचारावें ? तिच्याबद्दलची हळहळ व्यक्त तरी कोणत्या शब्दांनीं, कशी करावी ? पंचाईत पडली मला. विचारावें तरी कठीण, व विचारावें, न बोलावें तरी अवघड ! माझ्या तोंडांतून शब्द फुटेना. शरयूही बोलेना. काय बोलणार बिचारी ? अश्राप पोर ! दुर्दैवी जीव ! इतक्या कोंवळ्या वयांत, तारुण्याच्या ऐन उंबरठ्यावर, दुर्दैवानें तिच्या सुखाच्या सौभाग्यावर घाला घातलेला. ती काय बोलणार ? तिच्या डोळ्यांत अश्रू चमकताहेत असें मला दिसलें ! तोंडाला तिनें हातरुमालाचा बोळा धरला होता. ती आपला हुंदका आंतल्या आंत दाबते आहे, पोटांत परत परतवीत आहे, अशी माझी खात्री झाली !

भेट झाली तर बोलल्याशिवाय सुटका नव्हती !

सानंद शुभ गोष्टींचें, आनंददायक हकीकतीचें वर्तमान विचारणार होतों, आतां दुःखद गोष्टींची शरयूला उजळणी करायला लावण्याचें माझ्या लेखीं आलें होतें.

प्राप्त कर्तव्य पार पाडणें माझें काम नव्हतें का ?

' शरयू !– ' मी सुरवात करीत होतों; ' हें असं कसं झालं ? गंगुनानांनीं मला कांहींच केव्हां कळविलं नाहीं ? '

तिला काय उत्तर द्यावें हें सुचेना. कशी देणार ती उत्तर ?

' तुला पाहून मला अतिशय वाईट वाटलं.– तुझं लग्न होऊन किती दिवस झाले ?– पुढं हें असं कशानं झालं ? काय आजार झाला तुझ्या मंडळींना ? '

शरयू माझ्या विचारण्यानें चांगलीच गडबडली. तिनें एकदां माझ्याकडे पाहिलेंसें केलें. मान वळविली. इकडे तिकडे नजर फिरविली.

' तुला पाहिलं तेव्हां किती आनंद वाटला मला ! किती आनंदानं मीं तुला हांक मारली शरयू ! आणि माझ्या नशिबीं तुझं हें पाढरं कपाळ पाहाणं आलं ! ' माझा कंठ गहिंवरला डोळ्यांत पाणी मावेना.

शरयूलाही वाइट वाटलें. हातरुमालानें तिनें आपले डोळे टिपले.

' तुझं लग्न केव्हां झालं ? ' मीं विचारलें.

' झालं एक वर्ष– ' शरयूनें रडक्या आवाजांत कसेंबसें सांगितलें.

' अन् हें असं झालं त्याला किती दिवस झाले ? ' हृदय विदारणारा प्रश्न मीं केला. त्याच्या पोटीं दुःख व्यक्त करणें हाच उद्देश होता माझा.

' सहा महिने झाले––' पहिल्यापेक्षांही शरयूचा आवाज कंपित झाला.

' अरेरे ! ' यापेक्षां माझ्या तोंडून जास्त काय बाहेर पडणार होतें ?

' दुर्दैव माझं – कपाळ फुटलं माझं !– ' शरयू रडत म्हणाली.

' गंगुनानांना किती दुःख झालं असेल– तुझ्याकडे पाहतांना त्यांना काय वाटत असेल रोज ? कल्पनाच करवत नाहीं––' मीं म्हटलें.

' नानांनीं हाय घेतली आहे. अंथरूण धरलंय त्यांनी–' शरयूनें माहिती दिली ! ' वाहिनी पण खंगत चालल्या आहेत––'

' दैवापुढं कोणाचं कांहीं चालत नाहीं ! ' मी वृथा, न पटणारें पण आवश्यक तें तत्त्वज्ञान बोललों. पुढें बोलणें बदललें. दुःखाचें बोलणें सोसवणार तरी किती ? आणि बोलून उपयोग तरी काय ? हातीं कांहीं नाहीं. शरयूच्या दुःखावर डागण्या. शरयूच्या घरचा पत्ता विचारून घेतला. संध्याकाळीं किंवा उद्यां त्यांना भेटायला येईन असें आश्वासन दिलें. मध्येंच ' तूं काय शिकतेस ? ' म्हणूनही विचारलें. ' मॅट्रिकमध्यें आहे ' असें तिनें सांगितल्यावर, दुःखांत सुख तेवढेंच वाटलें. तिला निरोप दिला.

शरयु जड पावलांनीं चालूं लागली. पुन्हां तिच्याकडे वळून पाहण्याचें धैर्य मला झालें नाहीं. पाहण्यांत कसला आनंद होता ?

ती शाळेच्या आवारात शिरली

मी अजून त्याच जागीं उभा होतों. कोठें, कोणत्या घरीं जावें, कोणाचें दार पुजावें, याकडे आतां मला वळणें प्राप्त होतें. मनांत शरयूच्या दुर्दैवी आयुष्याचे विचार थैमान घालीत होते. कर्तव्याचीही जाणीव दुसरे विचार देत होते. त्या गांवांतल्या एका वजनदार, थोर सदगृहस्थांनीं ओळखीच्या व वाङ्मयाची आवड असणाऱ्या लोकांची पत्त्यासह व नांवासह यादी दिली होती, ती खिशांतून काढून, त्यावर दृष्टि फिरवीत व अगोदर कोठें जावें, याचा

विचार करीत राहिलों— एक समोर रस्ता चालला होता—– डाव्या बाजूला एक वळण होतें. इकडे जावें कीं तिकडे वळावें, याची भवती न भवती मनाशीं चालू होती. निश्चय व्हावयाचा होता– त्यावेळी—

शाळेच्या आवाराच्या ठेंगण्याशा भिंतीच्या आड उभ्या असलेल्या चार सहा मुलींच्या हंसण्याचा एक मोठा आवाज माझ्या कानांवर आदळला. त्याबरोबर प्रश्नोत्तरें मोठ्याने सुरू झाली, तीं कानावर येऊं लागलीं.

'शेवडे, कोण ग तो खेडवळ बावळट होता?' एक आवाज.

'अन् शरयू, काय ग इतकं त्या भारवाहकाशीं हितगुज करीत होतीस?' दुसरा ध्वनि.

'मागणी का घातली त्या नंदीबैलानं भर रस्त्यावर?' आणखी आवाज.

'असंगाशीं संग नि प्राणाशीं गाठ पडण्याची वेळ आली असं वाटून तू हुंदके देऊं लागलीस वाटतं?' दुसरा एक आवाज! 'हंसतेस काय अशी? मघाशी गळा काढून रडत होतीस. डोळे पुशीत होतीस. पाहिलं आम्हीं साऱ्याजणींनीं! अन् आता हंसतेस?'

'हसूं नको तर काय करूं?' शरयूचें हें वाक्य आणि मोठ्यानें हंसणें माझ्या कानी एकदमच आलें! मी चमकलों. जाण्याकरितां पाय उचलला होता, पण थाबलों. कारण, पुढचे मला ऐकावयाचे होतें ना!

'तूं का रडत होतीस?'

'तो गांवढळ तुला काय विचारीत होता?'

'खरंच लग्नाची मागणी घातली तुला?'

'अगोदरची ओळख होती वाटतं?—–'

'हें काय तिला विचारतेस? ओळख असल्याशिवाय का कोणी रस्त्यांत बोलत उभं राहील?—'

'तो एक मेला गांवढळ– खेडवळ पडला. त्याला काय? कुठंही उकिरड्यावर उभा राहून बोलत उभा राहिला. पण शरयू, तूं शिकलेली. तुला कांहीं रीतभात?– सुशिक्षितांची, शहरांतल्यांची संस्कृति अशी का असते?'

' आतां अगोदर हंसूं नकोस. मजा काय केलीस– काय झालं तें सांग. इतक्यांत दुसरी घंटा होईल. सांग ना ?—'

' काय सांगूं कपाळ ?––'

' कपाळींच्या बाशिंगाचीच गोष्ट असेल तर ती अगोदर सांग ! '

' आमच्या ते ओळखीचे आहेत. खेड्यातले आहेत. त्यांनीं मला पाहिलं––'

' नि मागणी घातली ? '

' घातली असती ग ?– पण––'

' कुठें माशी शिंकली मग ––'

' माझ्या कपाळीं त्यांना कुंकू दिसलं नाहीं––'

' खरंच कीं ! घाम पुसताना तेंही पुसून टाकलंस कीं !– '

' त्यांना वाटलं माझं लग्न झालं–'

' नि तोंच कपाळही फटल तुझं ! कपाळीं कुंकू नाहीं ना ? '

पुन्हां एकदां त्या पोरींत प्रचंड हास्याचा कल्लोळ उठला !

' त्यांनीं गहिंवरून, डोळ्यात पाणी आणून दुःखाच्या कथा विचारायला सुरवात केली –' शरयू हंसतच मैत्रिणींना सांगत होती.

' मग तूं काय सांगितलंस ? काय केलंस ? '

' मीं बेमालूम नाटक केलं. ' शरयू सांगत होती. ' माझं लग्न झालं, असं साभिनय सांगितलं. '

' आणि पतीनं परलोकीं प्रयाण केलं हेंही सांगितलंस ?––'

' त्याच वेळीं हुंदके देत होतीस ना ? '

साऱ्या जणी पुन्हां हंसल्या ! माझ्या संस्कृतीच्या त्या पोरट्यांनीं पुरत्या ठिकऱ्या ठिकऱ्या केल्या !

' त्यांनीं खऱ्या भावनेनं कळवळून विचारल्यावर, मग नको का तसा अभिनय करायला ? '

' उन्हानं कपाळावर घाम येतो तो पुसतांना कुंकू पुसटतं, हेंही त्या बावळटाला समजूं नये ? तेवढ्यावर वाटेल ती कल्पना रचावी ? '

' मग त्यांना बावळट– खेडवळ-अडाणी–मूर्ख कुणीं म्हटलं असतं ग ? '

' चांगला अभिनय करतेस ! सिनेमांत गेलीस तर शांता आपटेपेक्षां जास्त प्रसिद्धीला येशील, बरं का शेवडे ! '

तेवढ्यांत सुट्टी संपल्याची घंटा वाजली. त्या पोरस्या तडक पळाल्या.

मला बावळट म्हटल्याचा, खेडवळ म्हटल्याचा, भारवाइक असें विशेषण लावल्याचा राग आला नाहीं. त्याबद्दल वाईट वाटलें नाहीं. पण वाईट वाटलें–नागर संस्कृतींत वाढणाऱ्या, खोट्या अभिनयाची संस्कृति कवटाळून, त्यांत मोठेपणा, चांगलेपणा मानणाऱ्या त्या चिमुरड्या पोरींच्या विचित्र मनोवृत्तीबद्दल वाईट वाटलें. अतिशय दुःख झालें.

आम्ही खेडवळ जित आणि हे नागर आमचे जेते ! आमच्या संस्कृतीला, आमच्या भावनेला– विचारसरणीला हंसतात, टवाळी करतात, हास्यास्पद ठरवितात– या कमालीच्या तापदायक विचारांचें चक्र डोक्यांत अत्यंत वेगानें फिरत असतां, तितक्याच मंदगतीनें मी माझे पाय उचलीत चालूं लागलें.

---

# सवतीवर प्रेम ? : १

नाना आणि मनूताई ही जोडी घराबाहेर पडली. नाना गंभीर होता; मनूताई आनंदांत दिसली. या जोडीच्या बाह्य हालचालींवरून चाळींतल्या लोकात लवकरच हा एक ‘ यशवंती विवाह ’ घडून येणार अशी हलक्या आवाजांत कुजबूज सुरू झाली होती.

स्त्रियांना सांवलीचीसुद्धां सवत सहन होत नाहीं, आणि असें असूनहि कित्येक प्रेमवीर आपल्या प्रेमळ पत्नीस सवतीचा सहवास सहन करण्याची कठोर शिक्षा करीत असतात.

‘ आपल्यावर हा दुर्धर प्रसंग नाना आणणार अशी कमलची —नानाच्या प्रेमळ अर्धांगीची— जवळ जवळ खात्रीच झाली होती. कारण, नानाचें आणि मनूताईचें बसणें, बोलणें, घराबाहेर जाणें, घरीं येणें, पुस्तकें वाचणें, हंसणें-सवरणें, गेला महिना सव्वा महिना कमल उघड्या डोळ्यांनीं पाहात होती. चाळींतल्या लोकांची मिस्किल कुजबूज ती ऐकत होती. ती आपल्याशींच कुढत होती. नानावर मनांतल्या मनांत ती अतोनात संतापली होती. आपण त्याला बोलूं म्हणून त्यानें अगोदरपासूनच गंभीरपणा आणला आहे. नानाची गंभीर मुद्रा म्हणजे आपल्याला झिडकारण्याची तयारी आणि मनूताईचें हंसतमुख म्हणजे आपल्यावर विजय मिळविण्याची सिद्धता, अशीच कमलची कल्पना ठाम झालेली होती.

नाना असें करील असें लग्न झाल्यापासून कमलच्या कधीं स्वप्नांतहि आलें नव्हतें. कारण, त्यांच्यांत निर्मळ प्रेमाची अकृत्रिम वाढच आजपर्यंत तशी झाली होती. पण आतां नानाची कानउघडणी कशी करावी, मनूताईशीं कसें वागावें, हें कमलला कळेनासेंच झालें होतें.

शहाण्यांनीं, सुशिक्षितांनीं असें करावें का ? निर्लज्जपणानें ते असे कसे वागतात ? पति-पत्नी प्रेमाची ही विटंबनाच नव्हे का ? शुद्ध आणि सात्त्विक प्रेमाची ही पायमल्ली नव्हे का ? हें कसें थांबणार ? याला कोण, कसा, केव्हां आळा घालूं शकणार आहे ? कमलच्या मनापुढें हे प्रश्न जळजळीत स्वरूपांत उभे राहात होते.

ती लेचीपेची नव्हती. ठणठणीत शब्दांनीं नानाची हजेरी घेण्याकरितां अनुकूल संधीची ती वाट पाहात होती.

नानाकडे क्रुद्ध दृष्टीनें आणि मनूताईकडे तिरस्कारानें पाहण्याचा एकहि क्षण कमल वायां घालवीत नसे. पण तिच्याकडे नानाचें किंवा मनूताईचें कधीं लक्षहि गेलें नाहीं. कारणहि नव्हतें. ते आपल्याच व्यापांत आणि उद्योगांत चूर असत. नाना-मनूताई यांना बोलतां-हंसतांना कमलनें पाहिलें म्हणजे " यांच्यापेक्षां खातेऱ्यांत लोळणारीं डुकरं बरीं ! तींच यांच्यापेक्षां चांगलीं असतील. नानाच्या पदरीं पडलें त्यापेक्षां एकाद्या गरीब भिकाऱ्याच्या पदरांत गांठ बांधली असती तर आपल्यावर अशी वेळ कधीं आली नसती ! प्रेमाच्या संसाराचा उन्हाळा झाला नसता. " हे विचार तिच्या मनांत थैमान घालीत.

*　　*　　*

" साळूबाय, लक्षुम्बाय, कमलबाय, भिक्षा वाढा ऽ ऽ व ऽ गरीबाला. " रोजचा पाढा पाठ म्हणत भिकारीण कमलच्या दारांत यायची. कमलच्या हातून चांगली पोटभर भिक्षा रोज त्या भिकारणीला मिळत असे. कमल तशी स्वभावानें फार चांगली. गरिबाची भारी कनवाळू. भिकाऱ्याला ती कधीं उष्टेंमाष्टें, शिळेंपाकें देखील घालायची नाहीं. पुष्कळ अन्न करायची ती. जें

आपल्या पानांत तेंच भिकारणीच्या फाटक्या पदरांत टाकायला कमलला अती आनंद वाटे. यासाठीं नाना तिची थट्टा करी. पण तिच्या धर्माच्या आड तो कधींच यायचा नाहीं.

कमलची दिनचर्या संसारात ही जी होती, तीच चालू होती.

भिकारणीनें साद घातली. कमल तिच्या पदरात अन्न टाकायला बाहेर आली. तिच्या पुढूनच नाना मनूमह नुकताच बाहेर गेला होता. क्रोध, तिरस्कार याची 'देणगी' तिनें त्याच्याकडे भिरकवली होती.

कमलनें भिकारणीला भिक्षा घातली.

"माजी माय! वाइच कोरड्यास द्या व!" कमलला भिकारणीनें तोंड वेंगाडून आणखी म्हटलें.

भिकारणीबरोबर रोज दोन पोरें असायची तीं आज चार आलीं होतीं. एक कडेला, एक पाठीवर, तिसऱ्यानें हात धरलेला, चौथे मागे उभें. भिकारणीच्या अंगावर चिंध्या, मग मुले उघडींनागडीं असतील तर नवल काय?

"आज हीं दोन मुलं जास्त कुणाचीं आणलींस ग?" कमलनें भिकारणीस सहज विचारलें. ती तिला कोरड्यास आणून घालण्यास निघाली होती, पण उगीचच तिनें जातां जाता विचारलें.

"हीं दोन पोरं माझ्या सवतीचीं हैती माय!" भिकारणीनें प्रेमानें त्या दोन पोरांना पुढें करीत माहिती दिली, "या पोरास्नी कोरड्यास व्होवं व!"

"तुझ्या सवतीचीं पोरं? तुलाहि सवत आहेच का" आश्चर्यानें थक्कच होऊन कमलनें भिकारणीला विचारलें.

"जी माय! माझी सवत गांवाला गेली व्हती ती काल आली बगा! लै चांगली हाय ती!—— पोरं पर लइ ग्वाड हैती. माजा जीव त्येंच्यावर भारी हाय. तीं बी मला जीव लावल्याती."

भिकारीण जाति-स्वभावानुसार बडबडत होती. कमलच्या डोक्यांत नाना विचार येत होते. भिकारीहि दोन दोन बायका करतात? भिकारणींना सवती असतात?

" सवत तुझ्याबरोबर चांगली वागते ?– " कमलने विचारले.

" व्हय माय –– "

" तुझा नवरा तुला आवडतो ? तूं त्याच्यावर रागावत नाहींस ?. "

" त्ये कशापायी जी ? माझा नवरा लै चकोट हाय व ! त्येचा बी लै जीव हाय माझ्यावर. "

" सवतीवरहि तुझी माया आहे म्हणतेस ? "

" व्हय ! व्हय जी. न असाया तिनं का माझं वंगाळ केलंया ? माझ्या नवऱ्यावर ती जीव करती; तवा ती पर मला आवडतीया. "

कमलच्या आश्चर्याला पारावरच राहिला नाहीं.

कमलनें भिकारणीला कोरड्यास घातले. भिकारीण तोंडभर दुवा देत पुढच्या घरीं गेली.

कमल अन्तर्मुख झाली. ती भिकारीण सवत सहन करते, सवतीच्या मुलांवर माया करते, त्याच्याकरितां भिक्षा मागते. नवऱ्यावर प्रेम करते. आपण स्वतः आनंदांत असते. भिकारीण– घाणेरडी भिकारीण आपली गुरूच झाली का ?– तिला गुरू केलें तर ?––

तिच्या पावलावर पाऊल टाकून चाललें तर ? आपला मनस्ताप शमेल ? आपण सुखी होऊं ?– कमल विचारच करूं लागली. आणि विचारांतीं तिचे कांहीं तरी एक निश्चित ठरले. नानाशीं वागण्याचा आपला पवित्रा बदलावयाचा हा तिचा निश्चय झाला.

* * *

मनूताई आपली सवत झाली तरी तिच्यावर आपण बहिणीसारखें प्रेम करावयाचें, आणि अशा प्रेमानें मनूताईला व नानालाहि जिंकावयाचें, असा निश्चय कमलनें केला. पण त्या दिवशीं तर नाहींच, पण पुढें चांगले आठदहा दिवस मनूताई मुळीं घरीं आलीच नाहीं. कुठें तरी अदृश्य झाली. कमलने अबोलपण सोडलें. मनूताईचा लवेदा मागचा सुटल्यामुळें नानाला कमलबरोबर बोलायला पहिल्यासारखी पुष्कळच फुरसद मिळूं लागली. तो मोकळ्या मनानें हसूं लागला, बोलूं लागला.

कमलच्या मनांतलीं मनोराज्यें ढांसळूं लागलीं. अखेर मनांतलें ओकून ' सवत सहन करायला— सवतीवर प्रेम करायला आपण आनंदानें तयार आहोंत. ' हें नानाला सांगून त्याला चकित करावें या उद्देशानेंच कमलनें नानाला एक दिवस आपण होऊनच विचारलें, " ती आतांशा येत कशी नाहीं घरीं ? "

" ती कोण ?— " नानानें विचारलें.

" मनूताई ! " मन घट्ट करीत कमलनें म्हटलें.

" मनूताई ? कां ? पण आतां ती कशाला येईल ? तिचं काम झालं ! " नानानें सांगितलें.

" कसलं होतं तिचं काम आपल्याकडे ? " कमलनें बुचकळ्यांत पडल्यासारखें होऊन विचारलें.

" मनूताईला म्युनिसिपालिटींत नोकरी हवी होती मास्तरणीची. तिच्या वडिलांनीं माझ्याकडे पाठविली होती तिला. म्युनिसिपल अधिकाऱ्यांकडे हेलपाटे घालावे लागले— अर्ज खरडावे लागले— तेव्हां तें एकदां कसं तरी जुळलं ! मनूताईच्या वडिलांच्या ऋणांतून आणि मनूताईच्या जबाबदारींतून सुटलों एकदां, तेव्हां बरं वाटलं मला. मनूताईच्या वडिलाच्या खटपटीनंच मला नोकरी मिळाली ना ?— मग त्यांच्याकारितां नको मला मनूताईसाठीं झटायला ?—" नानानें सरळ सारें कमलला सांगून टाकलें.

कमलनें कोणत्या हेतूनें मनूताईबद्दल विचारलें हें नानाला समजलें नाहीं. नानानें दिलेली माहिती ऐकून कमलचा चेहरा मात्र प्रेक्षणीय झाला.

---